# ॥ आशीर्वाद ॥



प. पू. श्री. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामीजी
सिद्धगिरी मठ, कणेरी

।। वंदे श्री सिद्धराम - काडसिद्धेश्वराभ्याम् ।।

# ईशावास्योपनिषद

## प्रा. द. ना. दुभाषी

**मुद्रण :**
देविका आर्ट प्रिंटर्स

**मुखपृष्ठ :**
समीर अक्षेकर/माधव लाड

**मुद्रीत शोधन :**
श्री. ज्ञानेश्वर भालेकर

**अक्षरजुळणी :**
ओंकार कॉम्प्युटर्स, डोबिंवली

**आवृत्ती पहिली :**
मार्च - २००५

**मुल्य : रु. ७०/-**

**प्रकाशक :**




**सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन**
**कणेरी, कोल्हापूर**

## प्रस्तावना

इ. स. २००४-२००५ हे वर्ष प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांनी त्यांचे सद्‌गुरू प. पू. काडसिद्धेश्वर महाराज यांचे जन्मशताब्दी वर्ष वेगळ्या स्वरूपात साजरे करण्याचा संकल्प सोडला आहे. विविध विषयांवरील १०० ग्रंथ प्रकाशित करण्याचा हा संकल्प, पारमार्थिक क्षेत्रातील परमपावन आणि ज्ञानी पुरुषाची स्मृती जागविण्याच्या दृष्टीने अत्यंत मंगल, पवित्र आणि उचित असाच म्हणावा लागेल. या ग्रंथाच्या माध्यमातून समाजमनाचे विविध विषयांत प्रबोधन होणार आहे. विचारकक्षा रुंदावणार आहेत. आजअखेर अनेक विचारवंतांची पंधरापेक्षा अधिक पुस्तके प्रकाशित झाली आहेत.

प्रा. द. ना. दुभाषी यांचे या परमपवित्र संकल्पातील भगवद्‌गीतेवरील अत्यंत सुलभ भाषेतील भाष्य 'सर्वांसाठी गीता - एक जीवनग्रंथ' हे पाच खंड ग्रंथरूपाने प्रकाशित झाले आहेत. पारमार्थिक क्षेत्रात साधना करणाऱ्या नव्या आणि जुन्या साधकांना या ग्रंथातील मार्गदर्शन अत्यंत मोलाचे ठरणार आहे. वाचकांनी या ग्रंथांचे उत्स्फूर्त व भव्य स्वागत केले आहे. त्या ग्रंथाचा प्रकाशन-विमोचन सोहळा अजून विस्मरणात गेला नाही. तोच त्यांचे 'ईशावास्योपनिषद' आणि 'केनोपनिषद' हे दोन ग्रंथ पारमार्थिक क्षेत्रातील वाचकांच्या भेटीसाठी आले आहेत. प्रा. दुभाषी हे कोल्हापुरातील एक नामवंत महाविद्यालयातील इंग्रजी विषयाचे विद्यार्थीप्रिय प्राध्यापक (निवृत्त) म्हणून या परिसराला सुपरिचित आहेत. आपल्या इंग्रजी विषयाच्या व्यासंगाबरोबरच संतसाहित्याचा त्यांचा व्यासंग फार मोठा आहे. श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा, श्रीमद् भगवद्‌गीता हे त्यांचे जिव्हाळ्याचे विषय आहेत. या विषयांवर त्यांनी हजारोंपेक्षा अधिक प्रवचने दिली आहेत. वारकरी संप्रदायातील अनेक साधक त्यांची प्रवचने श्रवण करून मंत्रमुग्ध होतात. त्यांची वाणी अत्यंत रसाळ व शुद्ध आहे. त्यांचे या ग्रंथावरील विवेचन, कठीण परमार्थ अत्यंत सोपा करून सांगणारे असते.

ज्ञानेश्वरीतील 'कर्मयोग' आणि 'भक्तियोग' साध्या आणि सोप्या भाषेत असंख्य श्रोत्यांपर्यंत पोहोचविण्याचे अत्यंत पवित्र काम आपल्या रसाळवाणीद्वारे त्यांनी चालू ठेवले आहे. श्रीमद् भगवद्‌गीता आणि ज्ञानेश्वरीतील निवडक

ओव्यांवरील त्यांची लेखमाला कोल्हापुरातून पारमार्थिक क्षेत्राला वाहिलेल्या मासिकातून वाचकांपर्यंत पोहोचली आहे. लोकांना ती भावली आहे.

'ईशावास्योपनिषद' आणि 'केनोपनिषद' हे त्यांचे ग्रंथ आध्यात्मिक क्षेत्रातील साधकांना आत्मज्ञान करून घेण्यासाठी अत्यंत उपयुक्त ठरतील. या ग्रंथातील त्यांची भाषा सर्वसामान्य साधकांनादेखील उमजेल इतकी सोपी आणि सुबोध आहे. या ग्रंथावर अनेक अधिकारी पुरुषांनी लिखाण केले आहे. पण त्या ग्रंथांत त्यांनी वापरलेल्या शास्त्रीय आणि पांडित्यपूर्ण भाषेमुळे ते ग्रंथ सामान्य माणसाच्या बुद्धीच्या आवाक्याबाहेरचे आहेत. प्रा. दुभाषींचे या ग्रंथावरील विश्लेषण समाजातील सर्व थरांतील पारमार्थिक साधकांना प्रकाशसंदायिनी ठरणारे आहे. बोधाची साधी, सोपी व रसाळ भाषा अतुलनीय आहे. या ग्रंथामुळे अनेक साधकांचे जीवन पारमार्थिक ऐश्वर्याने विभूषित होईल याबद्दल खात्री वाटते.

प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांनी ज्या हेतूनी हा संकल्प सोडला आहे, तो पुरा होण्यासाठी हे ग्रंथ निश्चितपणे फलदायी ठरतील. या ग्रंथाच्या प्रकाशन सोहळ्याच्या निमित्ताने ग्रंथकारांनी आणि प्रकाशकांनी प्रस्तावना लिहिण्याचे अत्यंत कठीण काम माझ्यावर सोपविले आहे, हेच मी माझे भाग्य समजतो. या ग्रंथाच्या वाचकांना अनेक शुभेच्छा. प्रा. दुभाषींच्या आगामी ग्रंथलेखनासाठी शुभेच्छा!

**ह. भ. प. प्रा. बाळकृष्ण आनंदराव चौगले**
कसबा बावडा,
कोल्हापूर

दि. ९ फेब्रुवारी २००५

# लेखकाचे मनोगत

पूज्य स्वामी विवेकानंदांनी गीता, वेद व उपनिषदे यांचा प्रसार पाश्चिमात्य देशांमध्ये हिरिरीने केला. प्राचीन भारतीय तत्त्वज्ञानाचे श्रेष्ठत्व त्यांनी सिद्ध केले. उपनिषदातील तत्त्वज्ञानाने स्वतः स्वामी विवेकानंद खूप प्रभावित झाले होते. स्वामी विवेकानंद म्हणतात, ''वेदज्ञानाच्या या सारभूत अंशाचे नाव वेदान्त वा उपनिषदे असे आहे. तो वेदांचा अंतिम, सारभूत भाग आहे. उपनिषदामधील उच्च आध्यात्मिक आणि तात्त्विक सत्येच प्रतीक-प्रतिमांच्या मूर्त, स्थूल रूपात आज आमच्या घरोघरी पूजिली जात आहेत.

वेदान्ताची ही तत्त्वे अरण्यातच अडकून न पडता ती समाजात आली पाहिजेत. ती केवळ गुहेत न राहता न्यायालयात, प्रार्थना मंदिरात, गरिबांच्या झोपडीत प्रविष्ट झाली पाहिजेत. प्रत्येक स्त्री-पुरुष, बालक-बालिका मग त्यांचा व्यवसाय कोणताही असो, ते कोठेही असोत, त्या सर्वांसाठी वेदान्त-उपनिषदे ही उपयुक्त आहेत,'' असा विवेकानंदांचा आग्रह होता.

अशीच भावना प. पू. अदृश्य काडसिद्धेश्वर स्वामींनी व्यक्त केली. किमान दहा उपनिषदांचे मौलिक तत्त्वज्ञान, सोप्यात सोप्या पद्धतीने, सामान्यातल्या सामान्य माणसापर्यंत पोहोचवावे अशी इच्छा त्यांनी व्यक्त केली. स्वामीजींच्या प्रेरणेने व प्रोत्साहनाने, ज्ञानसागरात डुंबायला लावणारी व विलक्षण आनंद देणारी ही गोष्ट मी स्वीकारली.

स्वामीजींच्या कृपाशीर्वादाने त्यातील पहिले 'ईशावास्योपनिषद' व दुसरे 'केनोपनिषद' पूर्ण झाले आहे. 'ईश' हे आकाराने लहान व अर्थाने महान असे उपनिषद आहे. या ईशोपनिषदाचा प्रभाव राष्ट्रपिता महात्मा गांधींवरसुद्धा एवढा होता की, त्यांनी विनोबा भावेंकडून आग्रह करून त्याचा भावार्थ लिहून घेतला.

पूज्य विनोबा भावे पहाटेच्या प्रार्थनेत हे ईशोपनिषद नेहमी म्हणत असत. साधकाची समग्र साधना त्यात थोडक्यात आलेली असल्यामुळे, प्रातःस्मरणाला ते उपयोगाचे आहे अशी त्यांची धारणा होती. या उपनिषदाबद्दल विनोबा भावे म्हणतात -

'ईशोपनिषद माझ्या हृदयाला अवर्णनीय समाधान देते. माझी सकाळची प्रार्थना त्यानेच होते. त्याचे कित्येक मंत्र गूढवत् भासतात, परंतु माझ्याशी ते मोकळ्या मनाने गोष्टी करतात.'

'खरोखरच ईशोपनिषद नव्हे तर इतर उपनिषदांतसुद्धा अनेक गूढ, विवादात्मक व विविध मत-मतांतरे असलेली ठिकाणे बरीच आहेत. माझी भूमिका ही उपनिषदावर भाष्य करण्याची नाही. वादविषयातील क्लिष्ट, अनावश्यक भाग टाळून, उपनिषदातील सुंदर तत्त्वविचार, सोप्यात सोपे करून सांगण्याचे माझे उद्दिष्ट आहे. संस्कृत न जाणणाऱ्यांनासुद्धा सहज समजेल व गोडी लागेल अशा पद्धतीने, कोठेही तत्त्वविचारांशी तडजोड न करता, संपूर्ण विषय मांडण्याचा हा प्रयत्न आहे.'

मनुष्याचा जन्म सफल होण्यासाठी व कृतार्थ होण्यासाठी आत्मज्ञानाची आवश्यकता आहे, असा सर्व उपनिषदांचा सारभूत संदेश आहे. ईशावास्योपनिषदात तेजस्वी जीवनाचे मंत्र ऋषींनी सांगितले आहेत. असे जीवन कसे जगावे, याचे मार्गदर्शनही केले आहे. भोग व त्याग, प्रवृत्ती व निवृत्ती, सुख-दुःख अशा संघर्षातून सहयोगात्मक समतोल कसा साधायचा याचे नेमके रहस्य उलगडून दाखविले आहे. हे उपनिषद जिज्ञासूंना, साधकांना तसेच पारमार्थिक मार्गावर वाटचाल करणाऱ्या सर्वांनाच अचूक व विधायक दृष्टी देणारे आहे.

उपनिषदातील या शुद्ध, पवित्र विचारांनी आपले जीवनसुद्धा परिपूर्ण व्हावे, या शक्तिशाली विचारांनी सर्वांचा नैतिक, आध्यात्मिक व भौतिक विकास व्हावा, केवळ ज्ञानप्राप्ती नव्हे तर त्या ज्ञानाने आपले जीवनसुद्धा सुंदर व्हावे.

प.पू. स्वामींनी सुरू केलेला हा ज्ञानयज्ञ याचसाठी आहे. ज्ञानानेच मनुष्याच्या जीवनात शांती, सुख, समाधान प्राप्त होते. ईशावास्योपनिषद हा त्याचाच एक भाग आहे.

**– प्रा. द. ना. दुभाषी**
कोल्हापूर

रत्नोदय सोसायटी,
२४६ अ/ई, नागाळा पार्क, कोल्हापूर.
(फोन : (०२३१) २६५१०४४
५६१२३८१

# ।। ग्रंथदान ।।

**शतेषु जायते शूरः सहस्त्रेषु च पण्डितः ।**
**वक्ता दशसहस्त्रेषु दाता भवती वा न वा ।।**

वरील सुभाषितात म्हटल्याप्रमाणे, दाता भेटण ही खरोखरच फार दुर्मिळ बाब आहे. एका सत्पुरुषाने दात्याला साक्षात देवाची उपमा दिली आहे, ते म्हणतात, "देव व दाता यात अंतर ते कोणते?"

परंतु जगद्‌गुरु काडसिद्धेश्वर महाराजांच्या आशीर्वादातून व प.पू. अदृश्य काडसिद्धेश्वर महाराजांच्या आचरणरुपी प्रेरणेतून एखादा दाता नावारुपाला येण यात विशेष ते काय! पाठीवर कृपा करणारा हात असेल तर पुढे जाण्यात वेगळीच मजा असते.

श्री. रामचंद्र भगत यांनी या पुस्तकासाठी अर्थदान करुन गुरुमाऊलीची कृपा संपादन केली आहे. 'ईशावास्योपनिषद' हे २३वे ग्रंथपुष्प त्यांच्यातर्फे गुरुचरणी अर्पण!

प्रकाशक
सिद्धगिरी गुरुकुल फाऊन्डेशन
कणेरी, कोल्हापूर

# अनुक्रमणिका



ॐ

# ईशावास्योपनिषद

## शान्तिपाठ

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

ईशा वास्यमिदं सर्वं
यत् किं च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुंजीथाः
मा गृधः कस्य स्विद्□ धनम् ।।१।।

कुर्वन्नेवेह कर्माणि
जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति
न कर्म लिप्यते नरे ।।२।।

असुर्या नाम ते लोकाः
अंधेन तमसाऽऽवृताः ।
तां स्ते प्रेत्याभिगच्छन्ति
ये के चात्महनो जनाः ।।३।।

अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् ।
तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातारिश्वा दधाति ।।४।।

तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।
तदन्तरस्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ।।५।।

यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्चति ।
सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ।।६।।

यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवा भूद्विजानतः
तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ।।७।।

स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरँ शुद्धम्पापविद्धम् ।
कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान्
व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ।।८।।

अन्धंतमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ।
ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाँरताः ।।९।।

अन्यदेवाहुर्विद्यया न्यदाहूरविद्यया ।
इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ।।१०।।

विद्यां चाविद्यां च यस्तद्वेदोभयँ सह
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्यया मृतमश्नुते ।।११।।

अन्धं तमः प्रविश्यन्ति येऽसंभूतिमुपासते ।
ततः भूयः इव ते तमः ये उ संभूत्याम् रताः ।।१२।।

अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ।
इति शुश्रुम धीराणाम् ये नस्तद्विचचक्षिरे ।।१३।।

संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयम सह ।
विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ।।१४।।



हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।
तत्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ।।१५।।

पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य
व्यूह रश्मीन्समूह ।
तेजोयन्ते रूपं कल्याणतमं
तत्ते पश्यामि
योऽसावसौ पुरुषः सोऽहमस्मि ।।१६।।

वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तँ शरीरम् ।
ॐक्रतो स्मर कृतँ स्मर क्रतो स्मर कृतँ स्मर ।।१७।।

अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।
युयोध्यस्मज्जुहुराणमेनी भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ।।१८।।

शान्तिपाठ

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

००० 

# वेद व वेदान्त (उपनिषदे)

भारतीय तत्त्वज्ञानात वेदांचे स्थान अपूर्व आहे. वेद हे अति प्राचीन वाङ्मय आहे ते अपौरूशेय म्हणून गणले जातात. वेद म्हणजे भगवंताचे निःश्वास आहेत असे म्हटले जाते व उपनिषदे म्हणजेच वेदान्त होय. उपनिषदे वेदांच्या शेवटी म्हणजे अंत्यभागी येतात म्हणून ती वेदान्त होत. उपनिषदांना वेदान्त म्हणण्यात आणखीही एक औचित्य आहे. वेदांनी ज्याचा अंत पाहिला आहे अथवा अंतिम ठाव घेतला आहे असे ज्ञान म्हणजे वेदांचे सारभूत ज्ञान उपनिषदात संग्रहित आहेत म्हणून ती वेदान्त होत.

वेदांच्या रचनेचा काळ निश्चित कोणता याबद्दल संशोधकांत एकमत नाही. साधारणपणे खिस्तपूर्व सुमारे ५००० वर्षे या काळापासून ते खिस्तपूर्व २००० सालापर्यंत वेदांची रचना झाली असे मत स्वीकारार्ह वाटते. मानव जातीच्या सर्वांत प्राचीन ग्रंथांपैकी एक म्हणून वेदांचे महत्त्व अनन्यसाधारण आहे. तत्कालीन जीवन पद्धतीचे वर्णन वेद-वाङ्मयात घडते म्हणून त्याचे ऐतिहासिक महत्त्वही अनन्यसाधारण आहे.

वेदांची मौखिक परंपरा आजही भारतात अस्तित्वात आहे. हजारो वर्षांपूर्वी वेद सुक्तांचे उच्चारण ज्या पद्धतीने केले गेले अगदी त्या पद्धतीनेच वेदांचे पठन करणारी मंडळी संपूर्ण भारतात अनेक ठिकाणी आढळतात. त्यांच्या स्वरामध्ये कुठेही फेरफार आढळत नाही. असा हा क्रम पिढ्यान्‌पिढ्या चाललेला आहे. हे एक जगातील महदाश्चर्य म्हणावयास हरकत नाही. वेदांची परंपरा ऐकण्यावर म्हणजे श्रवणावर आधारलेली असल्याने त्यांना 'श्रुती' असेही म्हणण्यात येते. भारतात जे अनेक पंथ, संप्रदाय आहेत त्यांची गंगोत्री ही वेदान्त आहे. ज्या अनेक धर्मकल्पना भारतातल्या विविध प्रांतांत आढळतात त्यातील बहुतेकांची बीजे वेदान्तात सापडतात.

वेद चार आहेत. ऋग्वेद, यजुर्वेद, सामवेद व अथर्ववेद ही त्यांची नावे आहेत. महाराष्ट्रातील सर्व संतांनी वेदांना माऊलीच्या स्वरूपात पाहिले आहे. संत तुकाराम म्हणतात,

**वेदांचा तो अर्थ आम्हांसीच ठावा ।**
**इतरानी वाहावा भार माथा ।।**

तर ज्ञानेश्वर माऊली सोळाव्या अध्यायात वेदांची महती सांगताना म्हणतात,



**ऐसिया वैदैकनिष्ठा । जालिया जरी सुभटा ।**
**तरी के आहे अनिष्टा । भेटणे गा ।। (अ.१६-४६१)**
**पै अहितापासूनि काढिती । हित देउनी वाढविती ।**
**नाही श्रुतीपरौती । माउली जगा ।। (अ.१६-४६२)**

**अर्थ** - 'अर्जुना, याप्रमाणे केवळ वेदांच्या ठिकाणी जर एकनिष्ठ झाले तर अकल्याणाची गाठ कोठून पडणार. (४६१) अकल्याणापासून काढणारी व हित देऊन वाढविणारी अशी श्रुतीशिवाय दुसरी कोणी माऊली जगात नाही. (४६२)

श्री ज्ञानेश्वर महाराज वेदांना तीनही जगांची माऊली असे म्हणतात. ज्याला स्वतःचे हित साधावयाचे असेल त्याने वेदांच्या आज्ञेच्या बाहेर जाऊ नये. गुरूंच्या वचनावर विश्वास ठेवून शिष्य जसा आत्मकल्याण करून घेतो तसे या वेदावर विश्वास ठेवून, श्रद्धेने नतमस्तक होऊन वेदांच्या तत्त्वज्ञानाचे आचरण करावे, कारण ही वेदमाता अहितापासून काढणारी, हित करून वाढविणारी अशी आहे. ही श्रुती जीवाचे ब्रह्माशी ऐक्य करते. म्हणून हिची हेळसांड कोणी करू नये. वेदांविषयी तक्रार करताना ज्ञानेश्वर माऊलीने एक उणीव मात्र दाखवली. ते म्हणतात की, वेद हे कृपण आहेत, कारण ते तीन वर्णांच्याच कानी लागले असे जरी असले तरी त्यांनी वेदांचे माहात्म्य नाकारले नाही. म्हणून ते एका ठिकाणी म्हणतात,

**वेदें जरी बहुत बोलीलें । विविध भेद सूचिले ।**
**तऱ्ही आपण हित आपुले । तेचि घेपे । (अ.२-२६०)**

**अर्थ** - वेदांनी जरी खूप तत्त्वज्ञान सांगितले असले तरी हे अर्जुना, जेवढे काही आपल्या हिताचे असेल तेवढे घ्यावे. कारण ज्याप्रमाणे सूर्योदय होताच अनेक रस्ते दिसत असतात, पण सगळ्या रस्त्यांनी चालता येत नाही. एकच रस्ता निवडावा लागतो. किंवा पृथ्वीवर खूप पाणी आहे, पण आपली गरज व तहान जेवढी असेल तेवढे पाणी आपण घेतो. त्याप्रमाणे जे ज्ञानी आहेत ते वेदार्थाचा विचार करून जेवढे इष्ट व हिताचे आहे तेवढे ह्या वेदरूपी सागरातून ग्रहण करतात, असा ज्ञानेश्वर माऊलींचा वेदाविषयी अभिप्राय आहे. आदिशंकराचार्यांपासून ते आजतागायत वेदांचा वेध घेण्याचा प्रयत्न अव्याहत चालू आहे.

वेदांच्या वर उल्लेखिलेल्या चार प्रमुख वेदांची रचना विशिष्ट पद्धतीने झाली आहे. प्रत्येक वेदाचे १) संहिता २) ब्राह्मणे ३) आरण्यके व उपनिषदे असे तीन भाग पाडलेले आहेत. संहितेत मुख्यतः देवदेवतांच्या स्तुतीपर मंत्र असतात. ब्राह्मण ग्रंथात प्रामुख्याने यज्ञक्रियांचे वर्णन येते. याशिवाय तो यज्ञ

यथाविधी का व कसा करावा, या संबंधीची चिकित्सा असते. शेवटी आरण्यके आणि उपनिषदे यात तत्त्वविचार हाच प्रमुख विषय म्हणून येतो. ब्राह्मण ग्रंथातील विषयाकडून उपनिषदातील विचाराकडे वळत असताना आरण्यके हा एक मधला टप्पा आहे. म्हणून ब्राह्मणातील यज्ञकर्मकांडाकडून उपनिषदातील ज्ञानकांडाकडे जाण्याचा पूल या दृष्टीने आरण्यकाकडे पाहता येईल, कारण आरण्यके व ब्राह्मणे तसेच आरण्यके व उपनिषदे यांच्यातील सीमारेषा अस्पष्ट आहे.आरण्यके म्हणजे वानप्रस्थाश्रमाला साजेसे निवृत्तीप्रधान विचार. उपनिषदातील विचार हे अति प्रगल्भ आहेत, तर आरण्यकामधील विचार हे या विचारांची पूर्व बैठक तयार करणारे आहेत.

ऋग्वेद व अथर्ववेद हे दोन अत्यंत महत्त्वाचे वेद. सामवेदातील पुष्कळसा भाग ऋग्वेदातून घेतला आहे. म्हणून ऋक्, साम आणि यजुस असे तीनच वेद सुरुवातीला मानले जात असत. कालांतराने अथर्ववेदाला मान्यता मिळून चार वेद झाले.

ऋग्वेदातील धर्मभावना, देवतेपुढे विनम्र होऊन तिच्या कृपाप्रसादाने इष्ट गोष्टी प्राप्त करून घ्याव्यात अशी आहे. तर अथर्ववेदाचा भर यातुविद्येवर म्हणजे जादूटोण्यावर आहे. मंत्रांच्या सामर्थ्याने व शास्त्रनुरूप ठराविक कर्मकांड आचरल्यास देवतांना आपल्याला हव्या त्या गोष्टी द्याव्या लागतात. त्यातही दोन प्रकारचे विचारप्रवाह आहेत. काही मंत्र हे जारणमरण व विघातक गोष्टी करण्यासाठी आहेत, तर काही मंत्र हे मंगलमय कामना ठेवून कल्याणकारी असे आहेत. ऋग्वेद आणि अथर्ववेद यातील संहिता भागात इंद्र, अग्नि, वरुण, मरुत, सोम, मित्र अशा अनेक देवदेवतांची स्तवने येतात. यांनाच सूक्ते किंवा मंत्र म्हणतात. यज्ञात हवी अर्पण करून आणि स्तुतिस्तोत्रे गाऊन देवतांना प्रसन्न करावे व आपणास इष्ट असलेल्या गोष्टी त्यांच्या कृपाप्रसादाने मिळवाव्यात यासाठी सूक्तांची योजना आहे. वरुण, इंद्र व विष्णू या प्रमुख देवता जरी असल्या तरी अनेक देवदेवतांचे वर्णन या ग्रंथातून केले आहे. मानवी संस्कृतीच्या या कालखंडात वैदिक लोक बहुदेवतावादी होते. निसर्गातील भव्य दिव्य व चमत्कृतीपूर्ण अशा प्रत्येक शक्तीमागे एक एक देवता आहे, अशी त्यांची धारणा होती. पुढे पुढे या अनेकत्वातून एकत्वाकडे पाहण्याचा दृष्टिकोनसुद्धा वेदकाळातील उत्तरार्धात निर्माण झाला. सुरुवातीला देवतांची स्तुतिस्तोत्रे मनोभावे गाऊन त्यांच्याकडून इष्ट गोष्टी मागून घ्याव्यात, एवढाच धर्माचा आशय होता. त्या काळी मूर्ती आणि मंदिरे नव्हती. पुढे यज्ञ करून अग्नीमार्फत देवतांना हवी द्रव्ये पोचवणे असे स्वरूप धर्माने घेतले, म्हणून ब्राह्मण काळात यज्ञीय कर्मकांड हाच धर्म बनला. यज्ञ हा सामाजिक जीवनाचा



केंद्रबिंदू ठरला. त्यामुळे समाजातील निरनिराळ्या थरांना यज्ञातील विविध कामे वाटून दिली जाऊ लागली. त्यामुळे या काळात यज्ञांना अवास्तव महत्त्व आले. चार वर्णांच्या आणि चार आश्रमांच्या कल्पनेची जोपासनाही याच ब्राह्मण काळात झाली.

सुरुवातीच्या काळात ऋषींची वृत्ती बहिर्मुखी होती. पण जसजसा विचारांचा विकास होत गेला तसतसा अंतर्मुख होण्याकडे व विश्वाचा सूक्ष्म विचार करण्याकडे कल होऊ लागला. यज्ञातील कर्मांचे अवडंबर जाऊन ब्रह्माच्या, आत्म्याच्या शक्तीचा शोध सुरू झाला. चिंतनावर भर देऊन विश्वातील दडलेल्या शक्तीचा सूक्ष्म विचार होऊ लागला. ब्राह्मण काळात यज्ञरूपी बाह्योपचारावर जे सर्वस्वी लक्ष होते ते आता अंतर्यामातील ऊर्जेच्या स्थिती आणि गतीवर केंद्रित होऊ लागले व उपनिषद काळात हा तत्त्वविचार अतिशय समृद्ध व परिपूर्ण झाला.

000

## उपनिषदांचे स्वरूप व महत्त्व

विश्वधर्म व प्रेमाचा संदेश देणारे उच्चतम तत्त्वज्ञान असणारी उपनिषदे संख्येने बरीच (२३९) असली तरी महत्त्वाची उपनिषदे म्हणून एकूण अकरा उपनिषदांचा उल्लेख केला जातो. ती ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्डक, माण्डूक्य, तैत्तिरीय, छान्दोग्य, ऐतरेय, बृहादारण्यक व श्वेताश्वतर अशी आहेत. शंकराचार्यांच्या भाष्यातून याच महत्त्वाच्या उपनिषदातील वचने उद्धृत केली आहेत. उपनिषद या शब्दाची फोड उप + नि + सद अशी करता येते. सद म्हणजे बसणे, उप आणि नि हे उपसर्ग लावल्याने, 'गुरूच्या फार जवळ (उप) आणि निष्ठापूर्वक (नि) बसणे' असा अर्थ होतो. वेदातील पहिल्या दोन भागांस कर्मकांड व शेवटच्या दोन भागांस ज्ञानकांड असे म्हटले जाते. या उपनिषदातील काही भाग श्लोकबद्ध आहे व बराचसा भाग गद्यात्मक आहे. उपनिषदामध्ये बराचसा भाग संवाद पद्धतीने सांगण्यात आला आहे. यम आणि नचिकेत (क), आरुणी आणि त्याचा पुत्र श्वेतकेतु (छा), इंद्र आणि प्रजापति (छा), याज्ञवल्क्य आणि त्याची पत्नी मैत्रेयी (बृ) इत्यादी संवाद प्रसिद्ध आहेत. बुद्धीने शोध घेत घेत काही सत्य प्रतिपादन करावे या वृत्तीतून उपनिषदांचा जन्म झाला. एका व्यक्तीने सलगपणे निर्माण केलेले वाङ्मय असे उपनिषदांचे स्वरूप नाही. भिन्नभिन्न काळात निरनिराळ्या ऋषींना स्फुरलेले विचार आणि त्यांना आलेल्या अनुभूती यांचे उपनिषदात कथन केलेले आहे. प्रत्येक उपनिषदात व्यक्तीला अमृततत्त्वाची प्राप्त कशी होईल याचीच चर्चा प्रामुख्याने आहे. आकर्षक असणाऱ्या व मोह पाडणाऱ्या नाशवंत प्रेय गोष्टींनी मनुष्याला अखंड सुख प्राप्त होत नाही. पण आत्मज्ञानाचे श्रेय प्राप्त झाल्यास त्याला अमृततत्त्व किंवा अखंड आत्मसुख प्राप्त होते, याबद्दल सर्व उपनिषदांत एकवाक्यता आहे. व्यक्तीच्या आंतर्यामी असलेला आत्मा हाच विश्वाचे आधारभूत तत्त्व जे ब्रह्म ते होय, याबद्दल सर्व उपनिषदांत एकवाक्यता दिसते.

वैदिक धर्म आणि वैदिक तत्त्वज्ञान या दोहोंचे उपनिषदे हे आधारभूत ग्रंथ आहेत. खरा धर्म म्हणजे आत्मज्ञान हे तत्त्व या उपनिषदांनी प्रभावीपणे मांडले आहे.

वेद काळ सोडून उपनिषद काळाकडे आपण जेव्हा पाहतो त्या वेळी एक गोष्ट प्रामुख्याने समजते ती ईश्वर जिज्ञासेपेक्षा आत्म जिज्ञासेकडे तत्त्वज्ञानी



आचार्यांचे मन अधिक गुंतले होते. वैदिक संहिता ग्रंथामध्ये सृष्टीतील निरनिराळ्या शक्ती या देवता आहेत असे मानून त्यांचे स्तवन करणे हे प्रमुख उद्दिष्ट होते, पण या उपनिषद काळात ईश्वरतत्त्वाचा असा वरवरच्या बाह्यदृष्टीने विचार न करता या सृष्टीच्या मुळाशी आणि त्या सृष्टीस आधारभूत असे कोणते मूलतत्त्व आहे याचा विचार शास्त्रीय दृष्टीने केला गेला. म्हणूनच वैदिक साहित्यातील प्रार्थना, ईश्वराविषयीची अवास्तव भीती, बहुईश्वरवाद, परमेश्वराचे स्तुतिपाठ अशा स्वरूपाचे वर्णन उपनिषदातून येत नाही. उलट आत्मा, ब्रह्म, परब्रह्म, आपरब्रह्म, आत्मा आणि ब्रह्म यांचे ऐक्य, कर्मसिद्धांत व मृत्यूनंतरची स्थिती, एकेश्वरवाद अशा प्रकारचे आत्मज्ञानाचे विषय उपनिषदामध्ये विशद केले आहेत. म्हणून उपनिषदे ही आत्मज्ञान सांगणारी व बहिर्मुखता सोडून अंतर्मुखतेला स्थान देणारी व बुद्धिवादी तात्त्विक विचारसरणी अवलंबणारी श्रेष्ठ ग्रंथसंपदा ठरली. म्हणूनच 'ज्याचे ज्ञान झाले असता बाकी सर्वांचे ज्ञान होते असे तत्त्व कोणते?' असा मुण्डक उपनिषदातील प्रश्न अन्य उपनिषदांतही पुनःपुन्हा विचारलेला दिसून येतो. उपनिषद काळातील ऋषींना ईश्वरप्राप्तीपेक्षा आत्मज्ञानाची ओढ अधिक होती.

अशा आत्मज्ञानाचा प्रत्यक्ष अनुभव कसा घेता येईल व त्यासाठी कोणत्या प्रकारच्या नीतीची, चारित्र्याची गरज आहे, याचा शोध त्यांनी घेतला. कठोपनिषदामध्ये नचिकेताने यमाला या आत्मज्ञानासंबंधी जे प्रश्न विचारले ते प्रश्न सर्व उपनिषदामध्ये पुनःपुन्हा आले आहेत. 'मनुष्य मृत्यूनंतर कोठे जातो?' 'आत्मा म्हणजे काय?' 'जगामध्ये सत्य गोष्ट कोणती?' 'बुद्धीच्या साहाय्याने आत्म्याचे स्वरूपज्ञान कितपत शक्य आहे?' अशा प्रकारच्या प्रश्नांची उत्तरे तत्त्वज्ञान व अनुभूतीद्वारे करणे हे उपनिषदांचे प्रमुख वैशिष्ट्य आहे. बृहदारण्यक उपनिषदात जनक राजाने याज्ञवल्क्य ऋषीस विचारले की, हा आत्मा कोणाकडून प्रकाशला जातो? तो आहे असे ज्ञान कोणाला होणार? त्याच्या अस्तित्वाचा पुरावा कोठून आणावयाचा? अशा प्रश्नांना याज्ञवल्क्याने उत्तर दिले की, जेव्हा सूर्य, चंद्र, अग्नी इत्यादी प्रकाशक अस्तास जातात तेव्हा हा आत्मा प्रकाशतच असतो, कारण तो स्वयंज्योतीही आहे. त्याचे अस्तित्व स्वसंवेद्य आहे. स्वप्न व जागृत अवस्थेत हा अनेक विषयांचा अनुभव घेत असला तरी तो स्वप्न व जागृती या दोहोंहूनही निराळा आहे. जेव्हा स्वप्नात विषय नसतात तेव्हा असंग आत्मा नसतो असे नाही. सुशुप्ती अवस्थेत तो आनंदाचा भोग घेतो. जागृती, स्वप्न व सुशुप्ती (गाढ झोप) या तिन्ही अवस्थांतील अनुभवांना तो साक्षी असतो. असा हा आत्मा हीच सर्वांत प्रियतम अशी वस्तू आहे असे याज्ञवल्क्य आपली पत्नी मैत्रेयी हिला सांगतात. मनुष्याला

जी कोणतीही गोष्ट प्रिय असते ती त्या त्या गोष्टीकरता नसून, स्वतःकरता म्हणजे आत्म्याकरता प्रिय असते, हे त्रिकालाबाधित सत्य त्यांनी आपल्या पत्नीला सांगितले. ते महान सत्य असे 'न वा अरे, सर्वस्य कामाय सर्व प्रियं भवति, आत्मनस्तु कामाय सर्वं प्रियं भवति ।' पती प्रिय असतो तो पतीच्या काही कामनेसाठी नव्हे तर आपल्या स्वतःसाठी, पुत्र प्रिय असतो तर पुत्रासाठी नव्हे तर आपल्यासाठी, म्हणून साऱ्या आनंदाचा व सुखाचा जिवंत झरा हा आत्माच आहे. म्हणून अशा आत्म्याचे चिंतन, मनन, निधिध्यासन करावे असे उपनिषदांचे म्हणणे आहे. कारण अशा आत्म्याला जाणून घेतल्यानंतर जाणावयाचे काही शिल्लक राहत नाही, कारण आत्मा हे ब्रह्माचेच स्वरूप आहे.

सर्व उपनिषदांत ब्रह्माच्या या स्वरूपाविषयी खूप सांगितले आहे. ब्रह्म हे आनंदरूप म्हणून सांगितले आहे. छान्दोग्य उपनिषदात त्याचे स्वरूप 'सत्' असे केले आहे. आरुणी आपला पुत्र श्वेतकेतु याला म्हणतो, 'पुत्रा प्रथमतः हे केवळ सत् होते. त्या सत्मध्ये जाणिवेचे असे स्फुरण झाले की आपण बहू व्हावे म्हणून ही नामरूपांची सृष्टी निर्माण झाली. तेच सत् तत्त्व सर्वत्र भरून राहिले आहे. ते आत्मस्वरूप आहे व तो आत्मा तूच आहेस.' या उपनिषदात, 'तत्त्व मसि' (ते तू आहेस) हे वाक्य श्वेतकेतुला अनेक वेळा उच्चारिले आहे. अद्वैत वेदान्त मतातील चार महावाक्यांपैकी हे एक आहे. सर्व उपनिषदांमध्ये ब्रह्माची दोन प्रकारची वर्णने येतात. ब्रह्म अविकारी, निर्गुण, भेदरहित आहे. त्याचप्रमाणे ते विकार पावून जग निर्माण करणारे, बहू होणारे आणि शुभ गुणांनी युक्त आहे, असेही म्हटले आहे.

ब्रह्म निर्गुण आहे असा विचार उपनिषदांतून जागोजागी व्यक्त केला आहे, असे असूनसुद्धा त्याच्या विकारीत्वाचेसुद्धा वर्णन आहे. सगुण-निर्गुण वादात श्री शंकराचार्यांनी अशी बाजू घेतली आहे की, निर्गुण ब्रह्म हे खरे अंतिम तत्त्व अथवा परब्रह्म होय. त्याचे ज्ञान ही पराविद्या होय. अविद्येमुळे अथवा मायेमुळे त्याच्यावर गुणांचा आरोप होतो. हे सगुण ब्रह्म उपासनेला उपयोगी असल्याने उपनिषदांत त्याची वर्णने येतात अशी एक बाजू सांगितली जाते. अशा दोन्ही प्रकारांची वर्णने उपनिषदांत असली तरी जग हे ब्रह्माधारित आहे. ब्रह्माकडून स्वतंत्र असे अस्तित्व नाही या मुद्यावर मात्र उपनिषदांत मतभिन्नता नाही. ब्रह्म जगात ओतप्रोत आहे, ब्रह्माच्या आधारानेच जग आहे याबद्दल सर्व उपनिषदांत मात्र एकवाक्यता आहे. 'सर्व खलु इदं ब्रह्म', 'अयम् आत्मा ब्रह्म', तत् त्वम् असि', 'अहं ब्रह्म अस्मि' ही महावाक्ये उपनिषदातून उद्धृत झाली आहेत. मुण्डक उपनिषदात म्हटले आहे की, त्या परमसत्याचे



दर्शन झाले म्हणजे हृदयातील सर्व संशय, जळमटे निघून जातात. आत्मदर्शन झाल्यावर हृदयग्रंथी तुटतात, संशय विरून जातात, अमृततत्त्व व अभयत्व मिळते व जीवन सार्थकी लागते, असा महिमा उपनिषदातून व्यक्त झाला आहे. असा आत्मज्ञान झालेला मनुष्य सर्व भूतांना आपल्या ठिकाणी पाहतो व आपणास सर्वांच्या ठिकाणी पाहतो. अशा पुरुषास कोणताही मोह व कसलाही शोक राहत नाही, असे ईशोपनिषदात म्हटले आहे. अशा उपनिषदांनी मनुष्याचे परमप्राप्तव्य आत्माच आहे व आत्मकाम होणे यातच त्याची कृतकृत्यता आहे असे प्रतिपादिले आहे. कृतकृत्य ही नैतिक संकल्पना उपनिषदात आली आहे. कृतकृत्य म्हणजे ज्याने आयुष्यात आपली कर्तव्ये पूर्णपणे पार पाडली आहेत असा 'सत्यम् वद धर्मचर, मातृ देवो भव, पितृदेवो भव' अशा प्रकारची नैतिक तत्त्वे उपनिषदांनी आदर्श जीवनासाठी सांगितली आहेत.

मृत्यूनंतर कोणता जन्म मिळावयाचा हे या जन्मातील कर्माने ठरते. पुनर्जन्म हा अपरिहार्य आहे असे सांगून मृत्यूनंतरच्या स्थितीचे वर्णनही उपनिषदांनी केले आहे. गुरुदेव रानडे यांनी उपनिषदांची स्तुती करताना म्हटले आहे, 'उपनिषद साहित्यातील हे तत्त्वज्ञान देशोदेशीच्या साधकांच्या भौतिक, तात्त्विक आणि धार्मिक आकांक्षा पूर्ण करणारे असून, आत्मसाक्षात्काराच्या अनुभूती संपन्न पायावर ते उभारलेले असल्याने धर्म, जाती, संप्रदाय आदी क्षुद्रमतभेदांचा छेद घेणारी विश्वात्मकता या तत्त्वज्ञानामध्ये आहे. उपनिषदांतगत अनुभूतीप्रधान तत्त्वप्रणालीमध्ये धर्म, तत्त्वज्ञान आणि भौतिकशास्त्रे या त्रयींची बेमालूम सांगड घालण्यात आली आहे. बुद्धी आणि अनुभूती या दोहोंच्या साहाय्याने यांचे अध्ययन केले असता आधुनिक काळातही हे साहित्य प्रेरक ठरेल.'

आजही उपनिषदांचा अभ्यास जर्मनीसारख्या प्रगत देशात अखंडपणे सुरू आहे. आधुनिक शास्त्रांची प्रगती या औपनिषदिक तत्त्वज्ञानास पोषक आहे. भौतिक प्रगतीने मनुष्याला सर्व काही दिले आहे, पण त्याची मनःशांती मात्र तो हरवून बसला आहे. अशा काळात उपनिषदांचे हे तत्त्वज्ञान माणसाला आत्मशांतीचा व प्रसन्नतेचा मार्ग निश्चित दाखवू शकते.

000

# श्री ईशावास्योपनिषद्

## शान्तिपाठ

ॐ पूर्णमदः पूर्णमिदं पूर्णात् पूर्णमुदच्यते ।
पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ।।
ॐ शान्तिः शान्तिः शान्तिः

## मंत्र

### अर्थ

ते पूर्ण आहे, हे पूर्ण आहे. पूर्णापासून पूर्ण निष्पन्न होते. पूर्णातून पूर्ण काढून घेतले तरी पूर्णच शेष राहते. विश्वेश्वर पूर्ण आहे हे विश्वसुद्धा पूर्ण आहे म्हणजेच पूर्णातून पूर्णाची उत्पत्ती झाली आहे. या पूर्ण शब्दाऐवजी गणित शास्त्र अनंत असे म्हणते. हा एक शान्ति मंत्र आहे. यात पूर्णाच्या लीलेचे दर्शन दिसते. शान्ति मंत्र हा प्रत्येक उपनिषदाच्या आरंभी व अंती म्हणावयाचा असतो. आरंभी तो श्रद्धेने म्हणायचा व शेवटी तो समाधानाने गायचा. प्रत्येक उपनिषदाच्या प्रारंभी असलेला हा शान्ति मंत्र उपनिषदांच्या बाहेरचा समजला जातो. तसा हा शान्ति मंत्र बृहदारण्यकात समाविष्ट केला आहे. या शान्ति मंत्राचा उद्देश उपनिषद अध्ययनापूर्वी अनुकूल चित्तवृत्ती निर्माण करणे हा आहे. तसा उपनिषदातील विषयाशी या शान्ति मंत्राचा संबंध काहीही नसल्यामुळे केवळ शुभारंभ म्हणून तो लक्षात घ्यायचा.



## मंत्र पहिला

ईशा वास्यमिदं सर्वं
यत् किं च जगत्यां जगत् ।
तेन त्यक्तेन भुंजीथाः
मा गृधः कस्य स्विद् धनम् ।।१।।

### पदपाठ

ईशावास्यम्, इदम्, सर्वम्, यत्, किम्, च जगत्याम्, जगत्, तेन, त्यक्तेन, भुंजीथाः, मा, गृधः, कस्य, स्वित्, धनम् ।।

### अन्वयार्थ

जगत्याम् - अखिल ब्रह्मांडात
यत् किं च - जे काहीही
जगत् - जड, चेतनरूप जग आहे
इदम् - ते
सर्वम् - सर्व
ईशा - ईश्वराने
वास्यम् - व्याप्त आहे (म्हणून)
तेन - ह्या ईश्वराचे (स्मरण करीत)
त्यक्तेन - त्यागपूर्वक
भुञ्जीथाः - भोगा
मा गृधः - त्यात आसक्त होऊ नका (कारण)
धनम् - धन (भोग्य पदार्थ)
कस्य स्वित् - कोणाचे आहे?
(अर्थात् कोणाचे नाही. म्हणून कोणाच्याही धनाबद्दल आसक्ती राखू नका.)

### अर्थ

हे सर्व जग ईश्वराने वसविलेले आहे. म्हणून त्याच्या नावाने त्याग करून भोग भोगीत जा. कोणाच्याही धनाविषयी वासना राखू नकोस.

उपनिषद हा ज्ञानमार्ग सांगणारा वेदांचा एक भाग. ज्ञानमार्ग सांगणाऱ्या उपनिषदात ईशावास्योपनिषद हे एक श्रेष्ठतम् उपनिषद आहे. त्याला हे नाव पडले, कारण या उपनिषदाचा प्रारंभीचा शब्द ईशावास्य असा आहे. या शब्दाचा प्रभाव संपूर्ण उपनिषदभर आहे. केवळ १८ श्लोकांचे हे उपनिषद अर्थाच्या दृष्टीने महान आहे. सर्व उपनिषदांत त्यामुळेच त्याचे स्थान पहिले आहे. हे उपनिषद यजुर्वेदातील वाजसनीय संहितेत ग्रथित झाले आहे. ईशावास्यम् या शब्दाची फोड दोन प्रकारे करता येते.

१. ईशा + वास्यम् म्हणजे ईश्वराने हे जग आच्छादित झाले आहे. श्री शंकराचार्यांनी याचा अर्थ असा केला आहे की, ईश्वराने म्हणजे ईश्वरभावनेने जग झाकून टाकावे.
२. ईश + आवास्यम् म्हणजे हे जग ईश्वराचे आवास स्थान आहे, सर्व जीवन ईश्वरमय आहे. जगत् म्हणजे जगातील सर्व वस्तू. यातील काही वस्तू कदाचित प्रकट असतील तर काही वस्तू अव्यक्त स्वरूपात असतील.

या जगात अणुरेणूत ईश्वर वसलेला आहे. ईश्वर सर्वत्र आहे ही श्रद्धा जेव्हा दृढ होते त्या वेळी जगाकडे पाहण्याची मनुष्याची दृष्टी बदलते. ईश्वराने हे जग निर्माण केले आहे व त्या जगात तो राहत आहे, अशी भावना दृढ झाल्यावर आत्यंतिक भोगवादाने जगणारा माणूस थोडा भाववादी बनेल व पारमार्थिक जीवन जगणाऱ्याला यामुळे मार्गदर्शनही मिळेल. सृष्टीकडे केवळ भोगवादी दृष्टीने पाहणारी माणसे ही खा, प्या, मजा करा; जोपर्यंत जीवन आहे तोपर्यंत कसेही करून भोग भोगा, अशा असुरी प्रवृत्तीची ही माणसे आहेत. असुर म्हणजे 'असूषु रमते इति असुराः' दुर्योधनाने म्हटले आहे की, आम्ही केवळ रत्नांचा उपभोग घ्यायला जन्माला आलो आहोत. म्हणूनच तो धर्म जाणत होता पण त्याप्रमाणे वागण्याची वृत्ती त्याच्या अंगी नव्हती. तो अधर्म जाणत होता आणि तसाच तो वागत होता.

**'जानामि धर्मं न च मे प्रवृत्तिः । जानामि अधर्मं न च मे निवृत्तिः ।।**

दुर्योधनाने कबुली दिली की, तो धर्म जाणत होता, पण धर्माप्रमाणे वागण्याची प्रवृत्ती त्याला होत नव्हती. तसेच तो अधर्मही जाणत होता, पण त्यापासून दूर होण्याची बुद्धी त्याला होत नव्हती.

अशा प्रकारच्या भोगवादी लोकांना हे उपनिषद नैतिक बनवू शकेल व त्यांचा भोगवादी दृष्टिकोन बदलू शकेल.

या मंत्रात असा प्रश्न आहे की, तू कोणाचा भोग भोगतोस? व त्याचे उत्तरही तिथेच दिले आहे. की ही सृष्टी ईश्वराने भरलेली आहे. यामध्ये जी



जी भोग्य वस्तू आहे ती ती सर्व ईश्वराची आहे. त्यामुळे त्याचा भोग घेताना ईश्वराला समर्पित भावनेने स्मरून त्याचे सेवन करावे. मनुष्याचे विकार व विषय हेसुद्धा खरे म्हणजे ईश्वरदत्त आहेत. भगवंताने काम, क्रोध हे विकार खेळण्यांच्या रूपात जीवाला दिले आहेत. जीवन चालण्यासाठी विषयांची आवश्यकता आहेच पण हे विषय संयमाने व पवित्र समजून भोगावयाचे आहेत. ''धर्माविरूद्धो भूतेषु कामोस्मि भरतर्षभ'' असे गीता म्हणते. भगवंताने धर्माला अनुसरून असणारा कामसुद्धा माझीच विभूती आहे, असे म्हटले आहे. त्यामुळे या जगातले भोग हे भगवंताचे स्मरण करून व त्यानेच दिलेत असे समजून भोगावयाचे आहेत. मला श्रवण करायचे आहे पण कुणाचे? गुरू, ऋषी, भगवंत, संत-महात्मे यांची वचने कानांनी श्रवण करावी. स्पर्श कसा असावा? किंवा कोणाचा प्रभूस्पर्श व गुरुस्पर्श निश्चित असावा, गंध असावा, पण तो सात्त्विक गंध असावा, तसेच भोगरसापेक्षा भक्तिरस जीवनात यावा. शब्द, रूप, रस, गंध, स्पर्श याचे सर्व विषय व विकार संतांच्या जीवनातही होतेच पण त्यांनी याविषयांचे उदात्तीकरण केले व त्याचा वापर सर्वांचे कल्याण करण्यासाठी व शेवटी प्रभूकार्यासाठी केले. विषयांचे विभूतीकरण करणे याचे नाव भक्ती. या मंत्रातून ''तेन त्यक्तेन भूंजिथाः'' म्हणजे भोग भोगा पण तो त्याग करून भोगा, असा उपदेश केला आहे. ईश्वराची सत्ता इथे स्वीकारली पाहिजे म्हणजेच हे सर्व भोग त्याच्याच शक्तीने मी भोगतो म्हणून त्याच्याविषयीची कृतज्ञता भावना माझ्यात पाहिजे. अशी ईश्वराची सत्ता ओळखली की त्यागवृत्ती आपोआप येते व मग दुसऱ्याच्या भोगवृत्तीचा हेवा वाटण्याचे कारणच राहत नाही. अशा अहंभावाचा त्याग करून भोगणाऱ्या भोगात खरा आनंद आहे. स्वामित्वाची भावना काढून त्याग वृत्तीने विषयांचा भोग निर्भेळ सुख देते. भोग हा भगवंताचा प्रसाद समजून भोगायचा. मग कितीही वैभव, संपत्ती मिळाली तरी त्याचा मद किंवा अहंकार येण्याचे कारणच नाही. मालकीची भावना काढून टाकली आणि ईश्वराने दिलेल्या संपत्तीत, मी केवळ विश्वस्त आहे अशी भावना आली तर मिळालेला आनंद हा दैवी स्वरूपाचाच आनंद आहे. कारण आनंदाचे स्वरूपसुद्धा इथे समजून घेणे गरजेचे आहे. खरे म्हणजे आनंद हा विषयनिष्ठ नाही. वस्तूशिवायसुद्धा आनंद मिळू शकतो. आत्मसुख हे वस्तुनिष्ठ नाही. तर ते निरपेक्ष व निरतिशय आहे. श्रीखंड किंवा फूल पाहून जो आनंद होतो तो आनंद माझ्यातच आहे, पण अव्यक्त असलेले हे आत्मसुख या वस्तूमुळे प्रगट होते. झोपेत किंवा समाधीत जो आनंद मिळतो, त्यात फरक एवढाच की, झोपेचा आनंद हा अज्ञानजन्य व तमोगुणी आहे, तर समाधीचा आनंद हा ज्ञानजन्य व प्रकाशरूप आहे.

भोगवस्तूकडे पाहण्याची अशी वृत्ती आली की मग 'इदम् न मम' - 'हे माझे नाही' असे म्हणून भोगण्याची वृत्ती वाढेल व अशा वृत्तीतूनच जे भगवंताचे आहे, त्यातला काही भाग भगवंतासाठी काढून ठेवण्याची त्यागवृत्ती वाढेल. 'तेन त्यक्तेन' यामध्ये हा विचार सूचित करणारा आहे. दान केल्यामुळे संपत्ती स्वच्छ व पवित्र होते. भगवंताचा भाग काढल्यामुळे जो भोग भोगतो, तो एक प्रकारचा यज्ञच आहे. प्राचीन काळी ऋषीसुद्धा त्यांना जे मिळेल त्याचा सहावा भाग ते बाजूला काढीत असत व उरलेल्याचे सेवन करीत असत. भोगाचा उपयोग हा केवळ देहधारणेसाठी करावा. अति संग्रहामुळे केवळ अनर्थ ओढवतात. आवश्यकतेपेक्षा जास्त घेणे, हा खरा म्हणजे गुन्हाच आहे. म्हणूनच या मंत्राच्या शेवटी 'मा गृधः कस्य स्विद् धनम् ।' असे म्हटले आहे. गृधः म्हणजे गिधाड, इथे श्रृती सांगते की, गिधाडाची दृष्टी नेहमीच दुसऱ्याची लुटण्याची असते. तू गिधाड बनू नकोस. हे धन कुणाचे आहे? त्यावर हक्क कुणाचा आहे? याचा विचार करून या भोगाविषयी तृष्णा ठेवू नकोस. यावरील मालकी ही केवळ ईश्वराची आहे असे समजून भोग भोगल्यानंतर गिधाडाची दृष्टी जाईल. भोगवस्तूकडे पाहताना शेवटी हे शरीरसुद्धा माझे नाही, या भावनेपर्यंत आले पाहिजे. माझ्या शक्तीने हे चालत नाही. तो चालवणारा धनी ही ती ईश्वरीसत्ताच आहे, असा भाव दृढ होईल. म्हणूनच गीतेमध्ये या शरीराला क्षेत्र (किंवा शेत) असे म्हटले आहे व या क्षेत्राचा मालक हा क्षेत्रज्ञ म्हणजेच ईश्वर असे स्पष्ट केले आहे.

000



## मंत्र दुसरा

कुर्वन्नेवेह कर्माणि
जिजीविषेच्छतं समाः ।
एवं त्वयि नान्यथेतोऽस्ति
न कर्म लिप्यते नरे ।।२।।

### पदपाठ

कुर्वन्, एव, इह, कर्माणि, जिजीविषेत् शतम्, समाः । एवम्, त्वयि, न, अन्यथा, इतः अस्ति, न, कर्म, लिप्यते, नरे ।।

### अन्वयार्थ

इह - इहलोकात
कर्माणि - शास्त्रनियत कर्मे
कुर्वन् - करता करता
एव - च
शतम् - शंभर
समाः - वर्षे
जिजीविषेत् - जगण्याची इच्छा राखावी
एवं - अशाप्रकारे
कर्म - केले जाणारे कर्म
त्वयि - त्वा
नरे - देहधारी मानवाला
न लिप्यते - चिकटत नाही (तर फळाची वासना चिकटते)
इतः - ह्याशिवाय
अन्यथा - दुसरा (मार्ग)
न अस्ति - नाही

### अर्थ

इहलोकात - कर्मे करीत करीत शंभर वर्षे जगण्याची इच्छा ठेवा. कर्मयोग करणाऱ्या व्यक्तीला कर्म चिकटू शकत नाही. यापेक्षा कर्मबंधनातून मुक्त होण्याचा दुसरा कोणताही मार्ग नाही.

प्रथम असे सांगितले आहे की, जिजीविषेत म्हणजे जगण्याची इच्छा ठेवा. जीवन हे पाप आहे तेव्हा जगणेही पाप आहे. कारण मनुष्य जन्म हा पापामुळे प्राप्त होतो असे सांगणारी एक विचारधारा आहे. पण वैदिक धारणा मात्र पूर्णपणे वेगळी आहे. 'नर करणी करे तो नर का नारायण हो जाय.' हे शरीर जरी नश्वर असले तरी या शरीराच्या माध्यमातूनच आत्मज्ञान प्राप्त करून घेता येते, ईश्वरी साक्षात्कार करून घेता येतो. म्हणून संतांनीसुद्धा या नरदेहाला कधीच तुच्छ समजले नाही. वेद गर्जना करतात, 'जीवेम शरदः शतम् । अजिताः स्याम् शरदः शतम् । नंदाम शरदः शतम् । मोदाय शरदः शतम् ।' वेदांनी आशावादी, सकारात्मक अशी तेजस्वी विचारधारा सांगितली आहे. या तेजस्वी जीवनवादात कुठेही अनास्था नाही, निराशा नाही, वैफल्य नाही, जीवनाकडे बघण्याचा स्वच्छ दृष्टिकोन आहे. जीवनातील प्रत्येक क्षण हा आनंदाने जगता आला पाहिजे. शिवाय दीनदुबळ्यांसारखे न जगता यशस्वीपणाने व स्वसामर्थ्याने जगता आले पाहिजे. 'नायमात्मा बलहीनेन् लब्याः' असे कठोपनिषदात म्हटले आहे. सामर्थ्यहीन व लाचार मनुष्याला आत्मप्राप्तीसुद्धा होऊ शकत नाही.

कर्मयोग्यासच जगण्याचा हक्क आहे. जो कर्मयोग करतो त्याने शंभर वर्षे जगण्याची इच्छा ठेवावी. जे मांगल्याकडे नेते अशी कर्मे हातून घडावीत हा श्रुतीचा आग्रह आहे. कर्मयोग हीसुद्धा भक्तीच आहे. आपल्या कर्मरूपी फुलांच्या ओंजळीने ईश्वराची पूजा करावी. अशी पूजा भगवंतालाही आवडते. केवळ कृष्ण कृष्ण असा जप करून भक्ती पूर्ण होत नाही. भगवंताला या जगात कोणतेही कर्म केलेच पाहिजे असे नसतानाही भगवंत कर्म केल्याशिवाय एक क्षणही राहत नाही. साऱ्या विश्वाचा पसारा हा त्याच्या कर्माशिवाय चालत नाही. भगवान श्रीकृष्णाने व श्रीरामांनी आपल्या अवतारकार्यात मनुष्याने कर्म कसे करावे, हा वस्तुपाठ दाखवला आहे. अखेरच्या श्वासापर्यंत भगवंताला आवडणारे कर्म करणे हाच खरा म्हणजे कर्मयोग. ज्याच्या जीवनात निष्क्रियता आली तो खरे म्हणजे चैतन्यहीन झाला असेच समजावे. संत तुकारामांनीसुद्धा साक्षात्कार झाल्यानंतर केवळ "आता उरलो उपकारापुरता" असे म्हणून शेवटच्या क्षणापर्यंत कार्य केले. "देव घ्या, कुणी देव घ्या, देव घ्या, फुका न लागे रूका," असे सांगत ते घराघरातून फिरले. संत रामदास महाराष्ट्र धर्माची स्थापना करून अखंड परिभ्रमण करीत राहिले. संत नामदेवांनी पंजाबपर्यंत तीर्थयात्रा करून भक्तिमार्गाचा प्रसार केला. अलीकडच्या काळात स्वामी विवेकानंदांनी वैदिक धर्माचे तत्त्वज्ञान पाश्चात्त्य देशांत सांगण्यासाठी जगभर भ्रमण केले. विवेकानंदांची भारतातील पदयात्रा तर सर्वश्रुतच आहे.



सर्व संतांनी अखंड कर्मे करून भगवंताची भक्ती केली आहे. जीवन हे केवळ भोगासाठी नसून ते उत्तम कर्मे करण्यासाठी आहे. मिळालेले जीवन कृतार्थ करणे हे आपले उद्दिष्ट असले पाहिजे. ते तसे होण्यासाठी आपल्या कर्मालासुद्धा सुगंध प्राप्त झाला पाहिजे. जे कर्म निष्काम असते ते कर्म भगवंताला आवडते. भगवद्गीतेने अशा निष्काम कर्माचा उपदेश केला आहे. फळाची अपेक्षा न करता समर्पित भावनेने केलेले कर्म ही खरी भक्ती व याच्यातच आपला आत्मविकासही आहे व निरहंकारामुळे केलेले कर्म असल्यामुळे ती भक्तीही आहे.

असे निष्काम कर्म मनुष्याला कर्मबंधनात टाकत नाही. कर्तृत्वंभाव भोक्तृत्वभाव नसल्यामुळे असे कर्म मनुष्याला बंधनात टाकत नाही. 'इदम् न मम' ही माझ्या शक्तीने हे कर्म करीत नाही असे समजून जो आपला कर्तृत्व-भाव भगवंताला अर्पण करतो त्याला ते कर्म चिकटत नाही. म्हणून या मंत्रात शेवटी 'न कर्म लिप्यते नरे' असे म्हटले आहे. या जगण्यावर 'शतदा प्रेम करावे' अशा एका काव्यपंक्तीप्रमाणे खरोखर जगण्यावर प्रेम करावे, पण त्या जगण्यात केवळ स्वतःसाठी न जगता इतरांसाठी उत्तम कर्मे करीत जगावे असा मात्र भाव आहे. मला जशी जगण्याची इच्छा आहे तशी ती दुसऱ्यालाही आहे याची जाणीव आली की, स्वतःही सुखी व्हावे व दुसऱ्यालाही सुखी करावे, अशी उदात्त भावना मनात येते. उत्तम कर्मे करीत जीवन जगण्याचा हा मार्ग या मंत्रात सांगितला आहे.

०००

## मंत्र तिसरा

**असुर्या नाम ते लोकाः**
**अंधेन तमसाऽऽवृताः ।**
**तां स्ते प्रेत्याभिगच्छन्ति**
**ये के चात्महनो जनाः ।।३।।**

### पदपाठ

असुर्या, नाम, ते, लोकाः, अंधेन, तमसा, आवृताः ।
तान्, ते, प्रेत्य, अभिगच्छन्ति, ये, के, च, आत्महनः, जनाः ।।

### अन्वयार्थ

असुर्याः - असुरांच्या (म्हणून) ज्या
नाम - ओळखल्या जाणाऱ्या
लोकाः - योनी (लोक) आहेत
ते - त्या सर्व
अन्धेन तमसा - अज्ञान तथा दुःख क्लेशरूपी घोर महान अंधकाराने
आवृत्ताः - आच्छादित आहेत.
ये - जे
के च - कोणी
आत्महनः - आत्म्याची हत्या करणारे
जनाः - लोक (आहेत)
ते - ते (सर्व)
प्रेत्य - मेल्यानंतर
तान - त्या भयंकर योनीत (लोकांत)
अभिगच्छन्ति - वारंवार जातात.

### अर्थ

आत्मज्ञानाचे शत्रुत्व करणारे जे कोणी आत्मघातकी मनुष्य आहेत, ते देह पडल्यानंतर गाढ अंधाराने घेरलेल्या, आसुरी म्हणविलेल्या योनीकडे वळत असतात.

पहिल्या मंत्रात 'ईश्वर निष्ठा सांगितली' तर दुसऱ्या मंत्रात 'कर्मयोग निष्ठा' सांगितली. तर या तिसऱ्या मंत्रात या दोन्हीही निष्ठा नसणाऱ्या आसुरी वृत्तीच्या लोकांना मिळणारी गती सांगितली आहे. अज्ञान निंदा करणारा हा तिसरा मंत्र आहे.

आहार, निद्रा, भय, मैथुन या चारही गोष्टी मनुष्यात आणि प्राण्यात सारख्याच आहेत. पण केवळ मनुष्याला बुद्धीची देणगी प्राप्त झाली आहे. या बुद्धीच्या जोरावर मनुष्य ईश्वराप्रत जाऊ शकतो, आत्मज्ञान प्राप्त करून घेऊ शकतो व याच देहात असताना चारही पुरुषार्थांची प्राप्ती त्याला होऊ शकते. मनुष्य जन्म सार्थकी लावण्याचे सामर्थ्य त्याच्याकडे असताना, केवळ पशुतुल्य जीवन जगणारे लोक हे अज्ञानाने व तमोरूपी अंधाराने भरलेले असतात. ''यावज्जिवेम् सुखं जीवेत् ऋणं कृत्वा घृतं पिबेत् । भस्मीभूतस्य देहस्य पुरागमनं कुतः ।'' या चार्वाकाच्या तत्त्वज्ञानाप्रमाणे जगणारे लोक हे केवळ भोगातच रमणारे असतात. खा, प्या, मौज करा, कसेही करून सुखाने जगा, कारण एकदा हे शरीर नष्ट झाल्यावर त्याचे पुनरागमन शक्य नाही. पुनर्जन्मावर विश्वास नसल्यामुळे कोणतीही पापाविषयीची भीती अशा लोकांत नसते. म्हणून या मंत्रात अशा लोकांना असुर्या म्हणजे राक्षसी वृत्तीचे लोक असे म्हटले आहे. हे लोक तमोगुणाने आंधळे झालेले असतात. भगवान श्रीकृष्णांनी गीतेच्या सोळाव्या अध्यायात अशा असुरी वृत्तीच्या लोकांचे वर्णन केले आहे. असे लोक दंभ, दर्प, अहंकार, गर्व, अज्ञान अशा अवगुणांनी भरलेले असतात. स्वतःलाच ईश्वर समजून, मीच सर्व कोणी आहे, असे समजून सुख भोगण्याची इच्छा करीत असतात. आज मी हे मिळविले, उद्या मी ते मिळविणार, अशी मनोराज्ये ते करीत असतात. थोडक्यात, काम, क्रोध, लोभ, यात गुरफटून गेलेले असे लोक, मृत्यूनंतरच्या जीवनाची चिंता करीत नाहीत. काम, क्रोध, लोभ ही तीन नरकाची द्वारे आहेत असे भगवंतांनी म्हटले आहे.

असे राक्षसी वृत्तीचे लोक मेल्यानंतर मूढयोनीत जातात, असे या मंत्रात सांगितले आहे. जीवाला अहं वासना असल्यामुळे त्याला पुनर्जन्म आहे. पुनर्जन्माच्या सिद्धांताला पुष्टी देणारा हा मंत्र आहे. ''जातस्य हि ध्रुवो मृत्युः ध्रुवं जन्म मृतस्यच'' म्हणजे जो जन्मतो त्याला निश्चित मृत्यू आहे व ज्याला मृत्यू आहे तो निश्चित पुन्हा जन्म घेणार आहे. हा पुनर्जन्माचा सिद्धांत गीतेनेसुद्धा प्रतिपादला आहे. कारण या जगात कोणतीही वस्तू नाश पावत नाही तर जड वस्तूचेसुद्धा रूपांतर होते, जसे पाण्याचे ढगात व ढगांचे पाण्यात

रूपांतर होते. जड वस्तूचे रूपांतर होते तर चेतना मात्र जसे आपण कपडे बदलतो तसा वेष बदलते. म्हणजे एक देह सोडून दुसरा देह धारण करते. अहं व वासना प्रभावी असल्यामुळे हा बदल अनिर्वाय असतो.

"अंते मती सा गतिः" म्हणजे अंत्य समयी जशी वासना असेल, तसा जन्म त्या जीवाला मिळतो. जीवनभर जर वासनामय, भोगमय आयुष्य भोगलेले असेल तर मृत्युसमयीसुद्धा त्यांची वासना ही अधोगामी वृत्तीची असते. म्हणून या मंत्रात आत्महन हा शब्द वापरला आहे. आत्मा म्हणजे बुद्धी. अशा प्रकारच्या लोकांनी आपल्या बुद्धीचा नाश केलेला असतो, म्हणून त्यांनी आपला स्वतःचाच नाश घडवून आणलेला असतो. आत्महन म्हणजे भक्तिहीन, भोगपरायण लोकांना भगवंत, विद्या किंवा दैवीगुण अशा गोष्टींचे आकर्षण नसते. म्हणून असे लोक मृत्यूनंतरसुद्धा मूढयोनीत जातात.

जीव, अतृप्त वासना व अतृप्त इच्छा ह्यामुळे स्वतःला अनुरूप अशाच ठिकाणी जातो. देहापेक्षा वेगळे असलेले तत्त्व मृत्यूनंतर परत येते.

000



## मंत्र चौथा

**अनेजदेकं मनसो जवीयो नैनद्देवा आप्नुवन्पूर्वमर्षत् ।**
**तद्धावतोऽन्यानत्येति तिष्ठत्तस्मिन्नपो मातरिश्वा दधाति ।।४।।**

### पदपाठ

अनेजत् एकम् मनसः जवीयः न एनत् देवाः आप्नुवन पूर्वम् अर्षत् ।
तत् धावतः अन्यान् अत्येति तिष्ठत् तरिमन् अपः मातरिश्वा दधाति ।।

### अन्वयार्थ

तत् - हे आत्मस्वरूप (परमेश्वर)
अनेजत् - अचल व एक आहे (तरीसुद्धा)
एकम् - एक (आणि)
मनसः - मनापेक्षाही
जवीयः - अधिक (तीव्र) वेगवान आहे
पूर्वम् - सर्वांचे आदि (मूळ)
अर्षत् - ज्ञानस्वरूप किंवा सर्वांचे जाणणारे आहे.
एनत् - ह्या आत्मतत्त्वाला (परमेश्वराला)
देवाः - इन्द्रादि देवसुद्धा
न आप्नुवत् - जाणू शकले नाहीत (त्याच्यापर्यंत पोहोचू शकले नाहीत)
तत् - ते (आत्मतत्त्व - परमेश्वर)
अन्यान् - दुसऱ्या (अन्य)
धावतः - धावणाऱ्यांना
तिष्ठत् - (स्वतः) स्थिर राहूनही
अत्येति - मागे टाकते.
तस्मिन् - त्याच्याच सत्तेमुळे
मातरिश्वा - वायू आदि देव
अपः - जलवृष्टी इत्यादी क्रिया
दधाति - करण्यास समर्थ होतात.

## अर्थ

ते आत्मतत्त्व एकच एक, मुळीच हालचाल न करणारे, पण मनापेक्षाही वेगवान आहे. देव त्याला गाठू शकत नाहीत. त्याने मात्र देवांना केव्हाच गाठलेले आहे. धावणाऱ्या इतरांना ते उभे राहून मागे टाकते. प्रकृति-मातेच्या अंकावर खेळणारे प्राण त्याच्याच सत्तेवर चळवळ करीत असतात.

पहिल्या मंत्रात ईश्वरनिष्ठा व ईश्वरी आज्ञेचे प्रतिपादन केले आहे. दुसऱ्या मंत्रात कर्मनिष्ठा सांगितली व तिसऱ्या मंत्रात या दोन्हीही निष्ठा नसणाऱ्या असुरी लोकांचे वर्णन आले. आता या चौथ्या मंत्रात आत्मस्वरूपाचे वर्णन आले आहे. चौथा व पाचवा हे दोन मंत्र या परमतत्त्वाचे स्वरूप सांगणारे आहेत.

आत्मतत्त्वाचे हे वर्णन थोडे परस्पर विरोधी विशेषणांनी युक्त असलेले असे वाटते. नेहमीच्या सामान्य तर्कशास्त्राच्या तत्त्वात ते बसणारे नाही. कारण स्थिती आणि गती हे एकत्र असणे शक्य नाही असे सर्वसामान्य तत्त्व पण अशी परस्पर विरोधी तत्त्वे एकत्र नांदू शकतात असा वेदांताचा विशेष सिद्धांत आहे. याला 'वितर्क' असे शास्त्रीय नाव आहे. म्हणून या वर्णनात प्रथम म्हटले आहे की, ते आत्मतत्त्व अन्येजत् म्हणजे ज्याला कंप नाही, हालचाल किंवा विकार, गती नाही, असे हे आत्मतत्त्व आहे. हे आत्मतत्त्व अचल, अभय व निर्विकार आहे. म्हणून भगवंत निष्कंप, निर्विकार व निर्भय आहे. हे तत्त्व एक आहे. इथे एक म्हणजे एकटे नव्हे तर ते अद्वितीय व सर्वश्रेष्ठ असे आहे, म्हणून श्रुतिने इथे अनेजदेकम् असा शब्द वापरला आहे. आत्मतत्त्व हे सर्वश्रेष्ठ आहे म्हणून अशा तत्त्वाला जीवनात मनुष्याने सर्वश्रेष्ठ स्थान दिले पाहिजे. त्या सर्वश्रेष्ठ आत्मतत्त्वाचाच अंश आपल्यात असल्याने आपण खरे म्हणजे अमृताचे पुत्र आहोत. म्हणून पुत्राने या सर्वश्रेष्ठ परमतत्त्वाचा आश्रय केला पाहिजे. ज्याच्या अपरोक्ष अनुभूतीने मनुष्य जीवनाचे सार्थक होते, अशा कृतार्थ जीवनाचा ध्यास मनुष्याला असला पाहिजे. याचा जर अनुभव नसेल तर मनुष्याची वृत्ती भोगलालसेकडे व इंद्रियसुखाकडे लागते. मग असे असुरी प्रवृत्तीचे लोक कसे अज्ञानरूपी अंधकारात वावरत असतात त्याचे वर्णन आपण तिसऱ्या मंत्रात पाहिलेच आहे. मनुष्याचे श्रेष्ठत्व त्या सर्वश्रेष्ठ तत्त्वाशी जोडण्यातच आहे. मोठे व्हायचे असेल तर प्रभूशी संबंध जोडला पाहिजे. समर्थ रामदास स्वामी म्हणतात, 'समर्था घरचे श्वान त्याला सर्व देती मान।' मी समर्थाचा सेवक आहे, मग माझ्याकडे वाकड्या नजरेने बघण्याची कुणाची हिंमत आहे? जो राजाचा सेवक असतो, त्यालासुद्धा



सगळे जण मान देतात. म्हणून त्या आत्मतत्त्वाचा ध्यास मनुष्याने घेतला पाहिजे. असाच मनुष्य जीवन विकास करू शकेल. मी एक दिवस त्या आत्मतत्त्वाचा होईन म्हणजे मी पुरुषोत्तम होईन असे सर्वश्रेष्ठ ध्येय मनुष्याचे असले पाहिजे. अशा पुरुषोत्तमाचे वर्णन भगवद्गीतेतील १५ व्या अध्यायात आले आहे. जो प्रभूचा झाला त्याला जगात सर्व काही प्राप्त झाले व तो पूर्ण तत्त्वाला पोहोचला असे होईल. असा मनुष्य भगवंताप्रमाणे निर्विकार, निर्भय व निष्काम भावनेने सर्वांवर प्रेम करणारा होईल. भगवंत जसा सच्चिदानंद आहे तसा हाही पुरुष संतुष्ट व सर्वार्थाने आनंदी होईल.

परमात्मा या नामरूपात्मक जगाहून पूर्णपणे विलक्षण आहे. हे परमात्म तत्त्व संपूर्णपणे स्थिर आहे. या उलट जगातील प्रत्येक गोष्ट ही सतत कंप पावणारी व हलणारी अशी आहे. परमाणूंच्या आतील इलेक्ट्रॉन व प्रोटॉन अशा अति सूक्ष्म कणांपासून तो अब्जावधी प्रकाशवर्षे पसरलेल्या प्रचंड तारका समूहापर्यंत सारे काही गतिमान आहे, स्थिरत्व मुळीच नाही. सर्व विश्व व विश्वातील पदार्थ गतिमान आहेत, पण परमात्मा मात्र संपूर्ण शांत आहे.

असे हे आत्मतत्त्व स्थिर असूनही मनापेक्षाही वेगवान आहे. त्याची गती किती आहे? त्यासाठी उपनिषद सांगते, 'मनसो जवियः' ते मनापेक्षाही वेगवान आहे. ज्या मनाला राहावयाला त्रैलोक्यसुद्धा अपुरे आहे, व जे क्षणात अनंत अंतरावर जाऊ शकते, अशा मनापेक्षाही हे तत्त्व गतिमान आहे. तिन्ही काळ, दाही दिशा व संपूर्ण ब्रह्मांडाला व्यापून राहणारी ही गती आहे. मनाच्या गतीला कुठे बांधच नाही पण अशी अनंत मने, ज्याच्या एका कोपऱ्यात विसावतात त्या परमतत्त्वाचा वेग वर्णन करायला शब्द अपुरे पडतात. म्हणून ते तत्त्व मनापेक्षाही अत्यंत प्रभावी आहे. देवसुद्धा त्या तत्त्वापर्यंत पोहोचू शकत नाहीत, असे पुढे म्हटले आहे. येथे देव शब्दाचा अर्थ प्रकाशमान असा होतो व उपलक्षणेने तो इंद्रियांचा निर्देश करण्यासाठी वापरला जातो. कारण इंद्रिये ही विषयांना प्रकाशित करीत असतात. मन व इंद्रियाद्वारे परमात्म्याचे ज्ञान होऊ शकत नाही, कारण तो त्यांच्यापूर्वीच अस्तित्वात आहे व त्यांच्याहून अधिक वेगवान आहे. वस्तुतः देव म्हणजे ब्रह्मांडातील दिव्यशक्ती होय. जे पिंडी ते ब्रह्मांडी व जे ब्रह्मांडी ते पिंडी यामुळे ब्रह्मांडाचेच, पिंड हे प्रतिबिंब असल्यामुळे ह्या शक्ती इंद्रियादी रूपाने पिंडात राहिल्या आहेत. इंद्रिय शब्दाचा अर्थही इंद्रशक्ती असाच आहे. म्हणून ब्रह्मांडात परमात्मा व पिंडात अंतरात्मा म्हणजेच त्याचा अंश प्रतिष्ठित झाला आहे. असे असूनसुद्धा ही जड इंद्रिये त्या अगोचर परमात्म्याला ओळखू शकत नाहीत. दिव्यदृष्टी प्राप्त झाल्याशिवाय तुला माझे दर्शन होणार नाही, असे भगवंतांनी अर्जुनाला गीतेत सांगितले.

म्हणून भगवंतांनी त्याला दिव्यदृष्टी प्रदान केली. हे तत्त्व बुद्धीच्या पलीकडचे आहे म्हणून त्याचे वर्णन गीतेत, 'यो बुद्धेः परतस्तू सः ।' जो बुद्धीच्या पलीकडचा आहे, म्हणून बुद्धी त्या तत्त्वाला पकडू शकत नाही. अशा मनबुद्धीच्या कह्यात न येणारे हे परमतत्त्व आहे.

उपनिषदांचे या तत्त्वाविषयीचे म्हणणे एकच आहे की, ह्या जगात सर्वत्र हे तत्त्व व्यापून राहिलेले आहे. एकमात्र परमात्माच सर्व ब्रह्मांडात भरून राहिला आहे. तो एकाच जागी राहूनही सर्व धावणाऱ्यांना तो मागे टाकतो, कारण धावणारे सारे काही त्याचीच रूपे आहेत. त्याच्याच अस्तित्वाने अस्तित्वमान आहे.

म्हणून त्याच्याच आज्ञेने सर्व काही कर्मशील झाले आहे. सर्व पंचमहाभूते ही त्यांना दिलेल्या विशिष्ट कर्मानुसार गतिमान आहेत व कर्मशीलही. त्याच्याच आज्ञेने वायू सर्वत्र भ्रमण करीत असतो. त्याच्याच आज्ञेने सूर्य-चंद्रादीकांनाही प्रकाश व गती प्राप्त झालेली आहे. 'तस्मीन सति' म्हणजे आत्म्याच्या सत्तेवरच सर्व काही चालले आहे. हे ब्रह्मतत्त्व, प्राणतत्त्व व कर्मप्रवाह निर्माण करते. वस्तुतः ब्रह्म निर्विकारी आहे, पण त्याच्या ठिकाणी आपण विकारांचा आरोप करतो. जी आदिम शक्ती निर्गुण व निर्विकार आहे त्याच्या ठिकाणी आपण प्रेम, दया अशा गुणांचा आरोप करतो. हे त्या ब्रह्मतत्त्वाचे मानुषीकरण केल्यासारखे आहे.

प्रकृतीला येथे माता म्हटले आहे व परमात्म्याला पिता म्हटले आहे. गीतेतसुद्धा महत्‌ब्रह्म म्हणजे प्रकृती ही माता आहे व परब्रह्म हा पिता आहे व त्यांचे अपत्य म्हणजे हे सारे ब्रह्मांड, असे वर्णन आले आहे. भक्तांनी अशा भगवंतात प्राणतत्त्वाची स्थापना करून त्याचे मानुषीकरण केले. भगवान अविचल, निर्विकारी असेल पण भक्तांनी, संतांनी भक्तिमय होऊन आपला पिता जो जगन्नियता या तत्त्वाला विकारी केले व त्याचे मानुषीकरण केले. ब्रह्माचे मानषीकरण ही निव्वळ कल्पना नाही. ह्या मंत्रात उपनिषदकारांनी त्याचे समर्थन केले आहे. कारण ऋषी सांगतात की, ह्या जगातील समस्त प्राणिमात्राच्या सर्व हालचाली ह्या आत्म्याच्या अधिष्ठानावर चालत असतात. आत्मसत्तेशिवाय येथे दुसरी सत्ता नाही. या मंत्रात यासाठीच तिष्ठत् या शब्दाचा प्रयोग केला आहे. सर्वत्र भगवंताचे अधिष्ठान पाहण्यास सांगणारा हा मंत्र आहे. आत-बाहेर सर्वत्र तोच आहे हे ठासून सांगणारा हा मंत्र आहे. परमात्मा विश्वब्रह्मांडाच्या पलीकडे आहे हे सांगतानाच, ते विश्वब्रह्मांड परमात्म्यावरच अवलंबून आहे व त्याच्या केवळ एका अंशाने ते स्थित आहे, असे सांगणारा हा मंत्र आहे.



## मंत्र पाचवा

**तदेजति तन्नैजति तद्दूरे तद्वन्तिके ।**
**तदन्तरम्य सर्वस्य तदु सर्वस्यास्य बाह्यतः ।।५।।**

### पदपाठ

तत् एजति तत् न यजति तत् दूरे तत् उ अन्तिके ।
तत् अन्तः अस्य सर्वस्य तत् उ सर्वस्य अस्य बाह्यतः ।।

### अन्वयार्थ

तत् - ते
एजति - हालचाल करते (व)
तत् - ते
न एजति - हालचाल करीत नाही
दूरे - अतिशय दूर (आहे व)
तत् उ - ते
अन्तिके - अतिशय जवळ (आहे)
तत् - ते
अस्य - या
सर्वस्य - सर्व जगाच्या
अन्तः - आत परिपूर्ण (आहे व)
अस्य - या
सर्वस्य - सर्व जगाच्या
बाह्यतः - बाहेर पण आहे

### अर्थ

ते हालचाल करते, आणि ते हालचाल करीत नाही. ते दूर आहे, आणि ते जवळ आहे. ते ह्या सर्वांच्या आत, आणि ते ह्या सर्वांच्या बाहेर आहे.

चौथ्या मंत्रात ईश्वर स्वरूपाचे वर्णन आले आहे. पाचवा मंत्र हा त्याचाच विस्तार आहे. ह्यात त्या परमतत्त्वाची व्याप्ती दर्शविली आहे. 'तत एजति'

म्हणजे ते हालचाल करते व 'न एजति' म्हणजे हालचाल करीत नाही. याचा अर्थ ते तत्त्व स्थिरही आहे आणि चरही आहे. भगवंताने गीतेतील तेराव्या अध्यायात १५ व्या व १६ व्या श्लोकात त्याचे असेच वर्णन आहे. भगवान श्रीकृष्ण म्हणतात, 'ते परमतत्त्व सर्व भूतांच्या आत व बाहेरही आहे, अचर आहे व चरही आहे. सूक्ष्म असल्यामुळे ते अविज्ञेय आहे आणि दूर असूनही जवळ आहे. ते तत्त्वतः अविभक्त म्हणजे अखंड असताही सर्व भूतांत जणू काय नानात्वाने विभागून राहिले आहे व सर्व भूतांना धारण करणारे, ग्रासणारे, उत्पन्न करणारेही ते परमतत्त्व आहे.' ।। (अ-१३ श्लो. १५-१६)

जगात हालचाल करणारे तत्त्व, शुद्ध चैतन्य आहे. ईश्वरभक्त त्या तत्त्वाला ईश्वराचा अंश मानतात तर त्यालाच वैज्ञानिक लोक चेतन मानतात. उपनिषदांचे म्हणणे असे आहे की, हे शुद्ध चैतन्य विकार पावते व त्याच मूळ ब्रह्मापासून या जगाची निर्मिती झाली आहे. निरनिराळ्या दर्शनांनी जगाच्या निर्मितीची निरनिराळी कारणे दिली आहेत. प्रकृतीपासून जग निर्माण झाले असे सांख्यवाद म्हणतो तर नैय्यायिकांनी, हे जग अणूतून निर्माण झाले आहे असे प्रतिपादन केले आहे. तर ईश्वरवादी अणूवादी असे सांगतात की, अणू ईशनिर्मित आहे. अशा निरनिराळ्या वादांत उपनिषदकारांचा हा ब्रह्मपरिणामवाद बुद्धीला अधिक पटणारा आहे. ब्रह्मापासून हे जगत परिणाम पावले आहे व अशा जगात ते तत्त्व व्यापून राहिले आहे. ज्याच्यापासून जग भयभीत होते ते तत्त्व हालचाल करते, विकार पावते. त्यामुळे लोक भयभीत होतात तसेच हे तत्त्व हालचाल करीत नाही, विकार पावत नाही,त्यामुळे लोक भयभीत होत नाहीत. असा हा विरोधाभास या श्लोकात दाखविला आहे. एकाच तत्त्वात हे दोन परस्परविरोधी भाव, गुण त्याप्रमाणे कृती दाखविली आहे. ही त्या परमात्म्याच्या अचिंत्य शक्तीचा महिमा आहे. दुसऱ्या प्रकाराने असेही म्हणतात येईल की, आपल्या परमभक्तांना सुख देण्यासाठी, सगुण साकार रूपात आपल्या लीला दाखविण्यासाठी हे त्यांचे चालणे आहे व निर्गुण रूपात सदासर्वथा जे अचल राहतात, ते त्यांचे न चालणे आहे. ईश्वरनिष्ठ होऊन भगवंताची जे भक्ती करतात, त्यांच्यासाठी भगवान हालचाल करतो व जे ईश्वरनिष्ठ नसतात त्यांच्यासाठी तो हालचाल करीत नाही. थोडक्यात, भक्तांच्या ठिकाणी हे तत्त्व विकार पावते व अभक्तांच्या ठिकाणी ते हालचाल करीत नाही. सात्त्विक, सज्जन भक्तांविषयी भगवंताची भूमिका आईची असते. त्यांच्यासाठी भगवान हालचाल करतो. अशा लोकांना भगवंताची भीती वाटत नाही. परंतु जे सात्त्विक नसतात त्यांना भगवंताची भीती वाटते. विरोधाभास दाखविणाऱ्या या 'तत् एजति तत् न एजति ।' दोन शब्दातील अर्थ हा असा आहे.



नंतर हे उपनिषद सांगते की, ते तत्त्व फार दूर आहे व ते जवळही आहे - 'तद् दूरे तद्वंतिके ।'

दूर आणि जवळ या शब्दांनी काल आणि अवकाश हे दोन्ही समजून घेतले पाहिजे. हे दोन्ही अपरिमेय आहेत पण दोन्ही परमतत्त्वाच्या बाबतीत पूर्ण नाहीसे होतात. ते तत्त्व दूर आहे याचा अर्थ खूप साधना केल्यानंतर त्याची प्राप्ती होते. 'बहुनां जन्मनामंते ज्ञानवान्मां प्रपद्यते' (अ. ७.१९) अनेक जन्मानंतर ज्ञानसंपन्न मनुष्य मला येऊन पोचत असतो, असे भगवंताने गीतेत म्हटले आहे. ज्यांना भगवंताची प्राप्ती करायला कित्येक जन्म लागतात, त्यांच्यासाठी तो दूर आहे, परंतु अशी स्थिती प्राप्त झालेल्या लोकांना ते परमतत्त्व अगदी जवळ आहे. जे भगवत् पराङ्मुख आहेत व जे विषयभोगात रमलेले आहेत त्यांच्यासाठी तो दूर आहे व जे निर्विषय, निर्विचारी होऊन विषयामध्ये अनासक्त असतात त्यांच्यासाठी ईश्वर जवळ आहे. विषयरहित होण्यासाठी मनुष्याला साधनेची आवश्यकता आहे. सेवा, पूजा, ध्यान अशा साधनांनी विषयरहित स्थिती प्राप्त करता येते. गाढ झोपेत विषय नसल्यामुळे आनंदाची अवस्था असते. केवळ विषयामुळेच मनुष्याला सुख मिळते असे नाही. निर्विषय होण्याची अवस्था ही निर्विकल्प समाधीची अवस्था आहे. अशी अवस्था प्राप्त करण्यासाठी त्या परमतत्त्वावर निरतिशय व निःस्वार्थ प्रेम केले पाहिजे.

यानंतर या मंत्रात ते तत्त्व सर्वात आहे याचे प्रतिपादन केले आहे. 'तैसा हृदयामध्ये मी रामू । असता सर्व सुखाचा आराम ।' असे ज्ञानेश्वरांनी ज्ञानेश्वरीत म्हटले आहे, तर गीतेत १८ व्या अध्यायात भगवंत म्हणतात, 'ईश्वरः सर्वभूतानां हृद्देशे र्जुन तिष्ठति ' (अ. १८.६१) 'हे अर्जुना, ईश्वर सर्व भूतांच्या हृदयात स्थित आहे.' या मंत्रातसुद्धा या ईशतत्त्वाचा ठावठिकाणा सांगितला आहे. भगवान सर्वांच्या हृदयात आहे हे पूर्ण सत्य आहे. 'कोणाचिये सत्ते चाले हे शरीर । - आपुलिया बळे नाही मी बोलवत । सखा कृपावंत वाच्या त्याची ।' असे संत तुकाराम म्हणतात. जोपर्यंत पंचमहाभूतांनी बनलेल्या या मर्त्य शरीरात, तो चैतन्याचा अंश आहे तोपर्यंत हे शरीर चालते, हालते, बोलते, डुलते, खेळते; पण ती आतली शक्ती निघून गेली की ह्या शरीराला प्रेत किंवा शव असे म्हटले जाते. तो शेवटी पालापाचोळाच. भगवंताला सर्वस्व वाहणाऱ्या भक्तांच्या हृदयातील परमेश्वर, त्या भक्तालाही ओळखता येतो. भगवंताने या देहरूपी मंदिरात आपले अस्तित्व ठेवले आहे. या शरीराच्या माध्यमातूनच त्या अतिंद्रिय शक्तीला प्राप्त करूनघेता येते. भगवंताने ही अलौकिक कर्तृत्वशक्ती दिली आहे. या देहातच मनुष्य नराचा नारायण होऊ शकतो. 'सर्वस्य चाहं

हृदि संनिविष्टो' (अ.१५ . १५) - मी सर्वांच्या हृदयात वास करतो असे गीता सांगते व 'तत् त्वं असी' - 'तो तूच आहेस' असे उपनिषद सांगते. याही मंत्रात तेच सांगितले आहे की, ते परमतत्त्व सर्वांच्या आत आहे.

माझ्यातील ती परमशक्ती मी ओळखणे हे माझे ध्येय असले पाहिजे. ही जे ओळखतात ते महापुरुष होतात. माझ्या हृदयात भगवान आहे ही श्रद्धा मनुष्याचा आत्मगौरव वाढविते. या आत्मगौरवाबरोबरच दुसऱ्यातही भगवंत आहे ही भावना मनुष्यात आत्मीयता निर्माण करते. आत्मगौरव ही पहिली पायरी व लोकगौरव ही दुसरी पायरी. सर्व मनुष्यमात्रात भगवान राहतो ही वेदान्ताची गर्जना आहे. याचा जर अभ्यास झाला तर विषमता दूर होऊन समता प्रस्थापित व्हायला उशीर लागणार नाही. 'आत्मौपम्येन सर्वत्र समं पश्यति यः अर्जुन ।' (अ. ६.३२) हेच गीतेचे सांगणे आहे. म्हणजे सर्व भूतमात्रात जो ईश्वराला पाहतो तो द्वेष, मत्सर अशा विकारांपासून दूर राहतो. असा हा परमेश्वर जसा सर्वांच्या आत आहे तसा तो सर्वांच्या बाहेरही आहे. 'आत हरि बाहेर हरि । हरिने घरी कोंडीले' असे ही परमतत्त्व आत-बाहेर सर्वत्र आहे. तो सर्व जगात भरून राहिला आहे व या जगाबाहेरही तोच सर्वत्र आहे. पुरुषसुक्त सांगते, 'पादो स्य विश्वा भूतानि, त्रिपादस्यामृतं दिवि' - त्याचा एकच पाद काय तो विश्वाच्या रूपाने व्यक्त होत आहे व बाकी तीन अमृतमय आकाशात आहेत. सर्व जगत परमात्म्यात सामाविले आहे, पण परमात्मा त्याहून महान आहे.

या मंत्रात वेदान्ताचा उदात्त दृष्टिकोन व्यक्त झाला आहे. आत्मगौरव व लोकगौरव दृढ होण्यासाठी वेदन्तानी ही गर्जना केली आहे. मनुष्याची आत्मिक उन्नती व समाजाचीसुद्धा सर्वांगीण उन्नती करण्याचे तत्त्वज्ञान या मंत्रात सामावले आहे.

०००



## मंत्र सहावा

**यस्तु सर्वाणि भूतानि आत्मन्येवानुपश्यति ।**
**सर्वभूतेषु चात्मानं ततो न विजुगुप्सते ।।६।।**

### पदपाठ

यः तु सर्वाणि भूतानि आत्मनि एव अनुपश्यति ।
सर्वभूतेषु च आत्मानम् ततः न विजुगुप्सते ।।

### अन्वयार्थ

तु - परन्तु
यः - जो मनुष्य
सर्वाणि - संपूर्ण
भूतानि - प्राणिमात्राला
आत्मनि - परमात्म्यांत
एव - च
अनुपश्यति - निरन्तर पाहतो
च - व
सर्वभूतेषु - सर्व भूतांमध्ये
आत्मनम् - परमात्म्याला (पाहतो)
ततः - त्यानंतर तो (कधीही)
न विजुगुप्सते - कोणाची घृणा करीत नाही

### अर्थ

जो निरंतर आत्म्यातच सगळी भूते आणि सगळ्या भूतांत आत्मा पाहतो, तो मग (कोणालाही आणि कशालाही) कंटाळत नाही.

सर्वात्म दर्शनाचे हे दोन मंत्र आहेत. सहाव्या व सातव्या या दोन मंत्रात हे सर्वात्म दर्शन घडवले आहे. या दोन मंत्राशी साधर्म्य असणारे अनेक श्लोक गीतमध्ये आहेत. त्यातील एक समानार्थी श्लोक असा,

**सर्वभूतस्थमात्मानं सर्वभूतानि चात्मानि ।**
**ईक्षते योगयुक्तात्मा सर्वत्र समदर्शनः ।।** (२९ अ-६)

'ज्याचा आत्मा योगयुक्त झाला, त्याची दृष्टी सर्वत्र सम होऊन सर्व भूतांच्या ठायी आपण आणि आपल्या ठायी सर्व भूते आहेत असे त्याला दिसू लागते.'

या गीतेतील श्लोकात नेमका या मंत्रातील अर्थ विशद केला आहे. ईश्वराशी तादात्म्य पावणारी दृष्टी कशी असते, हे या मंत्रात उपनिषद सांगत आहे.

'यस्तु सर्वाणि भूतानि आत्मनिएव अनुपश्चति', म्हणजे सर्व प्राणिमात्रांना जो परमात्म्याच्या ठिकाणी, आत्म्याच्या ठिकाणी, चैतन्यामध्ये विचारपूर्वक पाहतो तसेच सर्व प्राणिमात्रांमध्ये जे प्रभूचैतन्य पाहतात अशा समदृष्टी लाभलेल्या ज्ञानी भक्तांना कोणाचीही घृणा वाटत नाही. सर्व भूतांच्या ठिकाणी ईश्वराला पाहणे व ईश्वराच्या ठिकाणी सर्व प्राणिमात्रांना पाहणे म्हणजेच सर्वत्र हरिदर्शन घेणे. इथे आत्मा शब्दाचा अर्थ प्रभू किंवा शुद्ध चैतन्य असा घ्यावयाचा आहे. तत्त्ववेत्ते आत्मा म्हणजे चैतन्य असे मानतात. पाश्चात्त्य विचारसरणीमध्ये व आपल्याकडेही कित्येक तत्त्वज्ञानी दोन तत्त्वे मानतात - जड आणि चेतन. चेतन म्हणजे शक्ती व जड म्हणजे द्रव्य. ज्याला आत्मा किंवा अनात्मा म्हणतात ह्या दोन तत्त्वापेक्षा तिसरे एक परमात्मा नावाचे तत्त्व गीता व उपनिषदे मानतात. हे तत्त्व सर्वव्यापी असून, ते 'कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थ' आहे. हे तत्त्व या ब्रह्मांडात काहीही निर्माण करू शकते किंबहुना त्याच्या सत्तेशिवाय झाडाचे पानही हलू शकत नाही. इतका तो या जगात भरून राहिला आहे. हे तत्त्व भक्तांना आश्वासनही देऊ शकते. 'नमें भक्तः प्रणशति' - माझ्या भक्ताचा कधीही नाश होत नाही किंवा 'यो मभ्दक्तः स मे प्रियः' - जो माझा भक्त असतो तो मला प्रिय असतो, असे हे परमात्म तत्त्व सांगते. या मंत्रात आत्मा म्हणजे केवळ शक्ती नव्हे तर तो केवळ प्रभू आहे. अशा प्रभूला तो सर्व भूतांत पाहतो व प्रभूमध्ये जो सर्व भूते पाहतो असा मनुष्य कोणालाही कंटाळत नाही. 'न विजुगुप्सते' हा या मंत्रातील शब्द या अर्थाने वापरला आहे. कंटाळा शब्दाने निंदा, तिरस्कार, घृणा असेही अर्थ निष्पन्न होतात.

अध्यात्मज्ञान हे मनुष्याचे जीवन बदलून टाकत असते किंबहुना जीवनाचे उदात्तीकरण व विभूतीकरण करण्यासाठीच अध्यात्म आहे. केवळ आहार, निद्रा, भय, मैथुन म्हणजे जीवन नव्हे. भगवंतांनी मनुष्याला इतर प्राण्यात नसलेली बुद्धी प्रदान केली आहे. या बुद्धीच्या जोरावर मनुष्य आपला सर्वांगीण विकास करू शकतो. अध्यात्म ज्ञानाने मनुष्याचे संपूर्ण आंतरिक जीवन बदलू शकते. जीव, जगत् व जगदीश्वर याच्या स्वरूपाचे ज्ञान जसजसे वाढत



जाईल तसतसा त्याचा आंतरिक विकास व्हायला लागतो. जसा विकास होईल तशी त्याची दृष्टी बदलायला लागते व दृष्टी बदलली की सृष्टीही बदलायला लागते. जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन उदात्त व्हायला लागतो. अज्ञानाचा अंधकार नाहीसा झाला की, भेदाभेद न राहता समदृष्टी यायला लागते, त्यामुळे सर्वांविषयींचे प्रेम, करुणा, दया अशा दैवीगुणांचा विकास व्हायला लागतो. असा विकास झाला की, जीवन जगताना निर्भेळ आनंद वाटायला लागतो. मग तो कशालाही कंटाळत नाही, कोणाचाही हेवा करीत नाही. द्वेष व मत्सररहित झालेल्या अशा मनुष्याला मग दुःख कसले!

दुःख, शोक, द्वेष, ईर्षा, भय, घृणा इत्यादी विकारांनी अज्ञानी मनुष्याचे जीवन ग्रासलेले असते. आयुष्यात अनुभवाला येणारी नाना दुःखे, संघर्ष, घालमेल हे सर्व विकार केवळ अज्ञानामुळे होत असतात. मी, माझे या अज्ञानजन्य भ्रामक समजुतीने सर्व अरिष्टे आपण स्वतःहून ओढवून घेतलेली असतात. पण जो सर्व वस्तूंना आत्म्यामध्येच अवस्थित असलेला जेव्हा बघतो तेव्हा मी व तू असा भेदच त्याच्या ठिकाणी राहत नाही. कुठल्यातरी एका शरीराला 'मी' म्हणायचे व इतर शरीरांना 'तू' किंवा 'ते' म्हणायचे असा भाव केवळ अज्ञानामुळेच उद्‌भवतो. ज्ञानी व्यक्तीचे 'मी', 'तू' लोप पावते व त्याला असा अनुभव येतो की, सारे मी - तू आत्म्यातच असतात. आत्म्याखेरीज त्यांना मुळीच अस्तित्व नाही. अशा आत्मदर्शनलब्ध व्यक्तीला नाना वस्तू आत्म्याहून वेगळ्या वाटतच नाहीत. सर्व वस्तूंतदेखील त्याला आपणच स्वतः अवस्थित आहोत असे वाटते. अज्ञानी व्यक्तीला जसे विकार छळत असतात तसे अशा ज्ञानी व्यक्तीला हे विकार छळत नाहीत, म्हणून तो कोणाचाही द्वेष करीत नाही व कुणाचीही घृणा करीत नाही.

जो ईश्वराशी तादात्म्य पावला त्याला भय व शोकही राहत नाही. असे लोक विषयांनासुद्धा घाबरत नाहीत. कारण अशा लोकांचा विषयाकडे पाहण्याचा दृष्टिकोनच बदललेला असतो. या लोकांच्या जीवनात दैन्य, दुःख याला वावच नसतो. पण ज्यांच्या जीवनात ही प्रभूशी असलेली तादात्म्यता नसते, त्यांना हा जन्म, हे जीवन दुःखाचे वाटते. पुन्हा जन्ममरणाचा फेरा नकोसा वाटतो. ते जीवनाला पुरते कंटाळलेले असतात, पण तुकारामांसारखे संत पुन्हा मनुष्य जन्म मागायला कचरत नाहीत. 'तुका म्हणे गर्भवासी । सुखे घालावे आम्हासी' अशी तुकाराम देवाकडे मागणी करतात. भगवंताचा विसर जर होणार नसेल तर आम्ही पुनःपुन्हा जन्म घ्यायला तयार आहोत, असे तुकारामांचे म्हणणे आहे. 'घेईन मी जन्म याचसाठी देवा, तुझी चरण सेवा साधावया' या संत तुकारामांच्या उक्तीप्रमाणे, आद्य शंकराचार्य जगदंबेकडे

अशीच मागणी करतात 'जजनि जननं यातू ममैव' - 'हे जगदंबे, तू मला जन्म दे!' या थोर पुरुषांना जीवनाचा कंटाळा कधीच आला नाही, कारण जीवनाकडे पाहण्याची त्यांची समदृष्टी. प्रत्येक प्राण्यात ती प्रभुशक्ती पाहायला लागणे ही खरे भक्ती आहे. तोच खरा परमार्थ आहे. देवपूजा म्हणजे केवळ यज्ञयाग व फुले अर्पण करणे नव्हे, पूजापाठ व मंदिरात जाणे नव्हे, तीर्थयात्रा व निरनिराळ्या देवदेवतांची निरनिराळ्या मागण्यांसाठी याचना करणे नव्हे. हे सर्व जरी घडत असले व आंतरिक वृत्ती व दृष्टी बदलली नाही तर ते केवळ क्रियाकर्मच होईल. त्यातून जीवन बदलले जाणार नाही. सर्व भूतांमध्ये भगवंताविषयी भाव निर्माण होणे ही भक्ती होय. सर्व भूते भगवंतात पाहणे ही आंतर्भक्ती व सर्व भूतांत भगवंत पाहणे ही बहिर्भक्ती होय. सर्व भूतांच्या ठिकाणी आत्म्याला पाहणे याचे नाव ज्ञान व भगवंताच्या ठिकाणी सर्व भूते पाहणे याचे नाव भक्ती. या दोन्हीही दृष्टी ज्याच्या जवळ असतील तो ज्ञानीभक्त. अशा ज्ञानीभक्ताजवळ अहंकार नसतो. तो निरहंकारी, निरिच्छ, निर्मम, निर्विषय होऊन आनंदाने जगत असतो. तो जीवनाचा तिरस्कारही करत नाही व कशाचाही कंटाळा करीत नाही.

०००



## मंत्र सातवा

**यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवा भूद्विजानतः**
**तत्र को मोहः कः शोकः एकत्वमनुपश्यतः ।।७।।**

### पदपाठ

यस्मिन सर्वाणि भूतानि आत्मा एव अभूत विज्ञानतः ।
तत्र कः मोहः कः शोकः एकत्वम् अनुपश्यतः ।।

### अन्वयार्थ

यस्मिन - ज्या स्थितीत
विजानवः - (परमेश्वराला) जाणणाऱ्या
महापुरुषांच्या (अनुभवात)
सर्वाणि भूतानि - संपूर्ण प्राणी
आत्मा - एकमात्र परमात्मास्वरूप
एव - च
अभूत् - होतात (त्या)
तत्र - त्या स्थितीत
एकत्वम् - एकमात्र परमेश्वराचा
अनुपश्यतः - निरंतर साक्षात् करणाऱ्या पुरुषासाठी
कः मोहः - कोणता मोह (राहतो? व)
कः शोकः - कोणता शोक (राहतो?)
(अर्थात ते शोक-मोह-रहित होऊन आनंदपूर्ण होतात.)

### अर्थ

ज्याच्या दृष्टीने आत्माच सर्व भूते झाला, त्या निरंतर एकत्व पाहणाऱ्या विज्ञानी पुरुषाला मोह कुठला आणि शोक कुठला?

या मंत्रात मागील श्लोकाचाच उत्तरार्ध प्रतिपादिला आहे. मागच्या मंत्रात सर्वत्र समदृष्टीने पाहणाऱ्याला जीवनाचा कंटाळा येत नाही असे घोषित केले आहे. याचा अर्थ त्याला जीवनाविषयी आसक्ती व मोह आहे अशी शंका

मनात येईल म्हणून या श्लोकाची मांडणी झाली आहे. मागचा मंत्र भक्ति-प्रेमपर होता तर हा मंत्र ज्ञानपर आहे. ज्याच्या दृष्टीने आत्माच सर्व भूते झाला त्या निरंतर एकत्व पाहणाऱ्या विज्ञानी पुरुषाला मोह व शोक कोठून येणार? म्हणून या मंत्रात अशा ज्ञानसंपन्न माणसाचा जीवनविषयक दृष्टिकोन कसा असतो हे सांगितले आहे.

असा मनुष्य जीवनाला कंटाळत नाही म्हणून त्याला जीवनाविषयीचा मोह आहे अशी शंका येऊ शकेल म्हणून या शंकेचे निवारण करण्यासाठी हा मंत्र आहे. 'यस्मिन्सर्वाणि भूतानि आत्मैवा भूद्विजानतः' हे संपूर्ण विश्व भगवंताचे आहे व या जगात अणू-रेणूंत, पाना-फुलांत, पंचमहाभूतांत, सर्व प्राणिमात्रांत तोच भगवंत राहिलेला आहे, अशी त्यांची धारणा होते. जे जे काही जगात आहे, ती ती सारी ईश्वराची निर्मिती आहे, अशी दृष्टी आल्यावर भगवंतावर जसे प्रेम आहे तसेच प्रेम त्याने निर्माण केलेल्या वस्तुमात्रावर होते. वस्तुतः खरे प्रेम प्रभूवरच असते म्हणजे बिंबावरही प्रेम व प्रतिबिंबावरही प्रेम. हे सर्व प्राणिमात्र व पदार्थ प्रभूचे असल्यामुळे त्यांच्यावर प्रेम जडते. हे सर्व पदार्थ आत्मस्वरूप झालेले असल्यामुळे मग शोक व मोह उरत नाही.

मोहामुळे शोक निर्माण होतो, शोक व मोह यामुळे दुःख निर्माण होते, म्हणून या मंत्रात हे विशद करण्यासाठी 'विजानतः' हा शब्द वापरला आहे. विजानतः म्हणजे ज्ञान व ज्ञान म्हणजे बुद्धीने जाणणे व विज्ञान म्हणजे जीवनात अनुभवाने जाणणे. ज्ञानानंतर ते ज्ञान अनुभवाद्वारे किंवा आचरणाने कृतीत आणले म्हणजे त्याचेच विज्ञान होते. विजानतः या शब्दामध्ये विज्ञान अपेक्षित आहे. ज्ञान वेगळे व विज्ञान वेगळे. दोहोत फरक आहे. भगवंत आपले जीवन चालवतो हे ज्ञान परंतु जी गोष्ट जीवनात जर आली तर त्याला विज्ञान म्हणायचे. जे ज्ञान अनुभवामध्ये परिपूर्ण होते त्याला विज्ञान म्हणायचे, म्हणून ज्ञाता + कर्ता = विज्ञाता म्हणून विजानतः म्हणजे ज्ञाता + कर्ता. सहज जाता जाता खेड्यातला मनुष्यसुद्धा एखाद्याला भेटल्यावर रामराम असा शब्द उच्चारतो. देव कोठे आहे, असा प्रश्न केल्यावर त्याचे उत्तर मिळते, देव काय सर्व ठिकाणीच आहे, तुमच्या माझ्यातसुद्धा आहे. अहो, तोच हे सर्व जीवन चालवतो, अशी सहज उत्तरे मिळत असतात. सर्व शास्त्र जिभेवर नाचत असते. असे दैवीविचार तोंडपाठ असतात पण याची प्रत्यक्ष अनुभूती असते का? बुद्धीला विचार समजला म्हणजे ते केवळ ज्ञान झाले व तो प्रत्यक्ष जीवनात आला तरच तो विजानतः झाला. सर्वभूती भगवान आहे हे ज्ञान व त्याचा ज्याला बोध झालेला आहे तो विज्ञाता.



आत्मा सर्वत्र आहे याचे तत्त्वज्ञान ज्याच्या जीवनात उतरले अशांसाठी या मंत्रात 'अनुपश्यतः' या शब्दाची मांडणी केली आहे. अनुदर्शन म्हणजे सतत दर्शन. आकाशात जेव्हा वीज चमकते त्या वेळी ती क्षणभर टिकते, पण जेव्हा सूर्य आकाशात असतो त्या वेळी त्याचा प्रकाश सतत प्राप्त होत असतो. ज्ञानी माणसाचे भगवंताविषयीचे प्रेम हे सतत असते. सर्व ठिकाणी भगवंत आहे व तो माझे व सर्वांचे जीवन चालवितो अशी धारणा सतत व्हायला पाहिजे. प्रेम हे क्षणापुरते नसते तसेच भक्तीसुद्धा काही ठराविक काळासाठी नसते. प्रेम, भक्ती ही अखंड धारा आहे. बुद्धीने व मनाने ते स्वीकारले की मग त्यात सातत्य राहते व जेथे सातत्य असते त्या ठिकाणी मग मोह व शोक राहत नाही. म्हणून दृढता व विश्वास असेल तर हे सातत्य राहते. ईश्वरावर संपूर्ण विश्वास ठेवून जो शरणागत झालेला असतो त्याच्या जीवनात भीतीचा लवलेश नसतो. सुख व दुःख हे दोन्ही ईश्वराचे प्रसाद आहेत असे समजून त्याने जसे ठेवले त्यात तो संतुष्ट असतो. भगवंतावरील प्रेमामुळे तो कशाचीच तक्रार करीत नाही. कारण भगवंत सर्वज्ञ असल्याबद्दल त्याचा पूर्ण विश्वास असतो. मला काय पाहिजे व काय नको हे ईश्वराला माहीत असल्यामुळे मी पुन्हा ते का मागावे अशी निश्चित धारणा त्याची असते, म्हणून अशा ज्ञानी भक्तांच्या जीवनात आशा, अपेक्षा, अतृप्ती, मोह, काम, क्रोध हे काहीही राहत नाही. सर्व जीवनपुष्पच ईश्वराला वाहिलेले असल्यामुळे त्या जीवनात येणारी प्रत्येक गोष्ट ही भगवंताचीच मानून तो सतत आनंदात मग्न असतो.

प्रत्येक जीवात्मा हा आनंद उपभोगण्यासाठीच जन्माला आलेला असतो. मूळ स्वरूपाने ते आनंदीच असतात, पण सांसारिक बंधनामध्ये अडकल्यामुळे ते आपल्या आनंद स्वरूपाला पारखे झालेले असतात. सुखाचा खरा केंद्रबिंदू ते परमप्रभू आहेत. त्या प्रभूचा जो ध्यास घेतो तो या मोहमायेत अडकत नाही. परमेश्वराच्या सेवेची शुद्ध भावना जो ठेवतो, तो अंतःकरणातून निर्लेप व शुद्ध असतो. अशा चित्तशुद्धी झालेल्या भक्तास भौतिक जीवनातील शोक व मोह ग्रासत नाही.

## मंत्र आठवा

**स पर्यगाच्छुक्रमकायमव्रणमस्नाविरँ शुद्धमपापविद्धम् ।**
**कविर्मनीषी परिभूः स्वयम्भूर्याथातथ्यतोऽर्थान्**
**व्यदधाच्छाश्वतीभ्यः समाभ्यः ।।८।।**

### पदपाठ

स पर्यगात शुक्रम् अकायम् अव्रणम् अस्नाविरम् शुद्धम्
अपापविद्धम् । कविः मनीषी परिभूः स्वयंभूः यथातथ्यतः अर्थान्
व्यदधात शाश्वतीभ्यः समाभ्यः ।।८।।

### अन्वयार्थ

सः - असा महापुरुष
शुक्रम् - परम तेजोमय
अकायम् - लिंगदेहरहित
अव्रणम् - क्षतरहित (देहदोषरहित आणि)
अस्नाविरम् - स्नायू (देहगुण) नी सर्वथा अलिप्त
शुद्धम् - शुद्ध (आणि)
अपापविद्धम् - शुभाशुभ कर्मसंपर्क - शून्य अशा (परमात्म्याला)
पर्यगात् - प्राप्त करतो
सः) - (तो) - परमात्मा
कविः (क्रान्तदर्शी सर्व दृष्टा)
मनिषी - ज्ञानस्वरूप
परिभूः - सर्वव्यापक (आणि)
स्वयम्भू - स्वेच्छेने प्रकट होणार आहे (आणि)
शाश्वतीभ्यः - अनादि
समाभ्यः - काळापासून
यथातथ्यतः - सर्व प्राण्यांच्या कर्मानुसार (यथायोग्य)
अर्थात् - संपूर्ण पदार्थाची
व्यदधात् - रचना करीत आला आहे



### अर्थ

ते त्या तेजस्वी, देह-रहित, अत एव व्रणादि (देहदोषां)पासून आणि स्नाय्वादि (देह-गुणां)पासून सर्वथा अलिप्त, शुद्ध आणि पाप-वेध-मुक्त, अशा आत्म-तत्त्वाला चारी बाजूंनी वेढून बसला. तो 'कवि' म्हणजे क्रान्तदर्शी, वशी-व्यापक आणि स्वतंत्र झाला. त्याने शाश्वत काळपर्यंत टिकणारे सर्व अर्थ यथावत् साधले.

आठव्या मंत्रातील हे वर्णन आत्म्याचे वर्णन म्हणून काहींनी स्वीकारले आहे. पण ते वर्णन आत्म्याचे न मानता आत्मज्ञानी मनुष्याचे मानण्याने मंत्राचा अर्थ अधिक सरळ लागतो. विनोबा भावेंनी या मंत्रातील वर्णन हे आत्मज्ञानी पुरुषाचे वर्णन आहे असे मानले आहे. सहाव्या व सातव्या मंत्रात त्याच पुरुषाचे वर्णन असल्याने ते सुसंगत वाटते. मागील दोन्ही श्लोकांत भगवंताशी तादात्म्य पावलेल्या महापुरुषांचे वर्णन आले आहे. अशा पुरुषांची जीवनदृष्टी कशी असते ते आपण जाणून घेतले. त्यांना जीवनाचा कंटाळा येत नाही, कारण हे जग ईश्वरनिर्मित आहे यावर पूर्ण श्रद्धा असल्याने प्रसाद म्हणूनच त्यांनी जीवनाचा स्वीकार केलेला असतो. ईश्वराशी एकरूप झालेल्या या पुरुषांना शोक व मोह हे ग्रासत नाहीत, असे वर्णन मागील दोन श्लोकांत आले आहे.

आता ह्या श्लोकात त्याच आत्मज्ञानी पुरुषाचे अधिक वर्णन आले आहे. अशा भक्तांना केवळ ज्ञानच प्राप्त झालेले नसते तर त्यांनी भक्तीची गोडीही अनुभवलेली असते. ज्ञान हे अनुभूतीतून आलेले असल्याने जीवनाकडे पाहण्याचा त्यांचा दृष्टिकोन हा सर्वस्वी वेगळाच आहे. हे महापुरुष कसे आहेत? हे महापुरुष 'शाश्वतीभ्यः समाभ्यः ।' म्हणजे मृत्यूपर्यंत, शाश्वत वर्षापर्यंत जीवनाचा जो खरा पुरुषार्थ तो त्यांनी पूर्ण केलेला असतो. अशा पुरुषांच्या मस्तकात ज्ञान, हृदयात प्रभूभक्ती व हातून घडणारे प्रत्येक कर्म हे भगवंताला आवडणारे कर्म असते. असे पुरुष प्रभूशी एकरूप होऊन गेलेले असतात.

आत्मज्ञ पुरुषाला येथे 'कवी' अशी समर्पक संज्ञा दिली आहे. कवी म्हणजे क्रान्तदर्शी. क्रान्तदर्शी म्हणजे पारदर्शी. देहाचा पडदा दूर सारून पलीकडचे पाहणारा. असे लोक पूर्णत्वाला पोहोचलेले असतात. कवी म्हणजे काव्य करणारा कवी नव्हे. कवी म्हणजे तत्त्वज्ञानी. ज्यांनी जीव व शिवाचे तत्त्व ओळखले, ज्यांना या विश्वाचे रहस्य समजले, ज्यांनी भगवंताचे स्वरूप व त्याच्या लीला ओळखल्या त्यांना कवी म्हणायचे. ज्यांनी बुद्धीच्या पलीकडचे जाणण्याचा प्रयत्न केला त्या महान पुरुषांना कवी म्हणतात. कवी शब्दाचा

एक अर्थ असाही आहे की, जे दुसऱ्याला दिसत नाही ते पाहणारा. 'जे न देखे रवि ते देखे कवि' असा पुरुष स्वतःच्या विकारांनासुद्धा ओळखतो व ते विकार दूर करण्याची बुद्धीही धारण करतो. काम, क्रोध, लोभ असे विकार त्याच्यावर सत्ता गाजवू शकत नाहीत. विकार व विषय हे पुरुषाला आत्मज्ञानापासून वंचित करतात. विचारशून्य म्हणजे निर्विचार व विकारशून्य म्हणजे निर्विषय झाल्याशिवाय आत्मज्ञानाकडे मनुष्याला वळता येत नाही. विकारांनी हृदयात स्थान पटकावल्यावर चित्त मलिन होते. म्हणून विकारांच्या निर्मितीचा क्षण ओळखायला हवा. यासाठी बुद्धी सतर्क व तीक्ष्ण व्हायला हवी. विकारांना दाबल्याने ते उफाळून येतात. त्या विकारांचे समर्थन न करता किंवा त्यांची निर्भर्त्सना न करता त्यांना पुरेपूर ओळखले पाहिजे. कवी हा विकारांच्या निर्मितीचा क्षण ओळखू शकतो. विकार ही भगवंताने दिलेली खेळणी आहेत त्यामुळे त्या खेळण्यांत आसक्त न होता ती खेळणी कशी हाताळावी हे कवीला समजते. अशा पुरुषाला ही विकारांची खेळणी छळत नाही. भगवंताने दिलेले विकार भगवंतासाठीच म्हणजे नीतिधर्माने वागून कसे हाताळावेत हे कवीला चांगले समजते.

या मंत्रात अशा महापुरुषांच्या लक्षणात 'मनीषी' हे एक लक्षण सांगितले आहे. जो मनावर सत्ता चालवू शकतो, म्हणजे मन जरुरीप्रमाणे आवरू शकतो किंवा जरुरीप्रमाणे वापरू शकतो तो मनीषी. कवी आणि मनीषी ही परस्परपूरक विशेषणे आहेत. मनाची सत्ता त्याच्यावर चालत नाही तर त्याची सत्ता मनावर चालते. ज्याची बुद्धी अत्यंत प्रभावी व समर्थ असते त्याची मनावरसुद्धा सत्ता असते. भगवंताला ज्याने बुद्धी समर्पण केली त्याची बुद्धी सामर्थ्यशील असते. बुद्धीत निर्णयशक्ती आहे. ही निर्णयशक्ती जेवढी प्रबळ असते तेवढी त्याची मनावर सत्ता असते. ज्याने मन-बुद्धी ईश्वराला अर्पण केलेली असते, तो ईश्वराने पाठविलेल्या सर्व गोष्टींचा आनंदाने स्वीकार करतो.

यानंतर या मंत्रात अशा महापुरुषांचे वर्णन करताना परिभू आणि स्वयंभू अशी दोन विशेषणे वापरली आहे. स्वयंभू असा त्याला माता-पिता, जन्माचे ठिकाण व जन्मवेळ अशा लौकिक गोष्टींचे भान नसते. हे लोक परिभू असतात, ते सर्व विषयांचा पराभव करणारे असतात. ते स्वतः परिपूर्ण असल्याने विषयाधीन होत नाहीत. विषयांना सांगायला हवे की, मी पूर्ण आहे, तृप्त आहे, आनंदी आहे, म्हणून मला तुमची गरज नाही. म्हणून विषय त्यांचे दास होतात. प्रभूने निर्माण केलेल्या विषयात प्रभूचे सौंदर्य पाहणारा हा खरा आत्मज्ञानी. जोपर्यंत द्वैत आहे तोपर्यंत विषय राहणारच, पण असे विषय हे



त्याचे गुलाम होऊन राहतात. तो विषयांचा गुलाम होत नाही. विषयात प्रभूचे सौंदर्य आहे हे केवळ शब्दरूपाने न जाणता त्याची प्रत्यक्ष अनुभूती त्याने घेतलेली असते. म्हणून ते परिभू असतात. स्वयंभू म्हणजे ते स्वतंत्र असतात. स्वयंभू याचा दुसराही एक अर्थ आहे. स्वयंभू म्हणजे स्वतःच्या ठिकाणी रममाण होणारा. याचा अर्थ तो आत्मकेंद्रित असतो असा नव्हे. तर असा पुरुष आपल्या आत्म्याच्या विशुद्ध रूपात रममाण झालेला असतो. तुकाराम महाराजांना संसाराचे खूप चटके सोसावे लागले, त्यांचे दिवाळे निघाले, पण त्यांनी ईश्वराला सांगितले, ''बरे झाले देवा दिवाळे निघाले । बरी या दुष्काळे पिडा केली । अनुतापे तुझे राहिले चिंतन । झाला हा वमन संसार ।।'' दिवाळे निघाले, दुष्काळाने खूप पिडा केली पण झाले हे सर्व बरे झाले, कारण या दुःखामुळे भगवंताचे चिंतन व्हायला लागले आणि संसार वांतीसारखा त्याज्य वाटू लागला. तुकारामांची ही अवस्था अशी होती कारण ते स्वयंभू होते.

यानंतर या मंत्रात उपनिषद सांगते की, ते असे पुरुष 'शुक्रम' म्हणजे तेजस्वी असतात. ईश्वराजवळ ते लाचारीने जात नाहीत, भीतीने पाहत नाहीत, दीन-दुबळे होऊन याचना करीत नाहीत, तर प्रभूकडे ते प्रभूचा पुत्र होऊन जातात, प्रेमाने नतमस्तक होतात. प्रभूशिवाय दुसऱ्या कोणत्याही ठिकाणी त्यांची निष्ठा नसते. आपल्या आंतरिक शक्तीची पुरेपूर जाणीव असल्यामुळे प्रभूशिवाय कुठेही ते नतमस्तक होत नाहीत. असा स्वयंभू व तेजस्वी पुरुष परमेश्वराजवळ निःस्वार्थ होऊन प्रेमाने व आदराने जातो.

यानंतर या मंत्रात 'अकायम्' असे विशेषण योजिले आहे. 'अकायम्' म्हणजे ज्याला लिंगदेह, वासनादेह नाही. जो कर्म घेऊन आला नाही तो अकायम् होय. कर्माचे गाठोडे ज्याने बुडवून टाकले तो अवकायम्. असे लोक केवळ भगवंतासाठी व भगवंताचे काम करण्यासाठी आलेले असतात. सर्व कर्मबंधनापासून मुक्त होऊन ते प्रभूसाठी काम करीत असतात. अशा आत्मज्ञानी पुरुषाला स्वतःसाठी काहीही संपादावयाचे नसते.

या मंत्रात 'अव्रणम्' हे विशेषण योजिले आहे. 'अव्रणम्' म्हणजे अक्षर व अविकारी अशा पुरुषांच्या ठिकाणी ईश्वराविषयीचा जो भाव असतो, तो सतत टिकून राहतो. यांना विषयांच्या सान्निध्यातही विकार निर्माण होत नाहीत. त्रैलोक्यसुंदरी रंभा समोर आली तरी शुकदेवजी अविकारीच राहिले. स्वामी विवेकानंदांना अमेरिकेत एका स्वरूप सुंदरीने लग्नासाठी गळ घातली, कारण तिला विवेकानंदांसारखा तेजस्वी मुलगा हवा होता. विवेकानंदांनी तिला उत्तर दिले, 'तुला माझ्यासारखाच मुलगा पाहिजे असेल तर तू मलाच तुझा मुलगा मान.' असे विकारी मन अशा आत्मज्ञानी पुरुषांकडे असते.

महापुरुषांचे वर्णन करीत असताना 'अस्नाविरम्', 'शुद्धम्' व 'अपाप-विद्धम्' अशी विशेषणे योजिली आहेत. 'अस्नाविरम्' म्हणजे स्नायूशून्य. स्नायू म्हणजे भौतिकशक्ती. अशा महापुरुषांना भौतिकशक्तीबद्दल कोणतीही आस्था नसते. सत्ता, संपत्ती, पद, प्रतिष्ठा, कीर्ति अशा ईशणा त्यांना छळत नाहीत. असे पुरुष भौतिकसत्तेला शरण जात नाहीत. 'शुद्धम्' म्हणजे जे शुद्ध, पवित्र व निर्मळ असते ते. अशा आत्मभान असलेल्या व्यक्ती भगवंतासाठी झीजत असतात म्हणून त्या पवित्र असतात. स्वतःतल्या भगवत् शक्तीला जाणल्यामुळे त्यांच्या ठिकाणी पावित्र्य असते. नंतर उपनिषद सांगते की, हे महान लोक अपाप-विद्धम् असतात, याचा अर्थ त्यांना पापाचा दर्प किंवा स्पर्श लागू शकत नाही. एखादे पाप त्यांच्या जीवनात आले तर त्याचे रूपांतरसुद्धा पुण्यात होते. आतन-बाहेरून पवित्र असल्यामुळे पाप त्यांना स्पर्श करू शकत नाही.

अशा प्रकारे सहा ते आठ या मंत्रांमध्ये आत्मज्ञानी पुरुषाचे गुणचरित्र वर्णन केलेले आहे. प्रभूशी तादात्म्य पावलेल्या लोकांचे हे वर्णन आहे.

०००



## मंत्र नववा

**अन्धंतमः प्रविशन्ति येऽविद्यामुपासते ।**
**ततो भूय इव ते तमो य उ विद्यायाँरताः ।।९।।**

### पदपाठ

अन्वम् तमः प्रविशन्ति ये अविद्याम् उपासते ।
ततः भूयः इव ते तमः ये उ विद्यायाम् रताः ।।

### अन्वयार्थ

ये - जे लोक
अविद्याम् - अविद्येची
उपासते - उपासना करतात (ते)
अन्धन्तमः - अज्ञानरूपी घोर अंधकारात
प्रविशन्ति : प्रवेश करतात (आणि)
ये - जे लोक
विद्यायाम् - विद्येमध्ये
रताः - रत होतात (ज्ञानाच्या मिथ्याभिमानात मत्त होतात)
ते - ते
ततः उ - त्यापेक्षाही
भूयः इव - जणू काय अधिक दाट
तमः - अंधारात
(प्रविशन्ति) - प्रवेश करतात

### अर्थ

जे कर्माची (अविद्या) उपासना करतात, ते अविद्यारूप अशा घोर अंधकारात प्रवेश करतात; आणि जे (कर्माचा त्याग करून केवळ) देवतांची उपासना करतात, ते अधिकच अंधकारात प्रवेश करतात. ।।९।।

जे अविद्येची उपासना करतात ते अंधकारात जातात व जे लोक विद्येत रममाण होतात ते त्यापेक्षाही दाट अंधकारात जातात. विद्या व अविद्या यांच्या बाबतीत उपनिषदाचा हा दृष्टिकोन आहे.

अविद्या म्हणजे लौकिक कर्म, अविद्या शब्द अनेक अर्थांनी वापरला जातो. अविद्या म्हणजे माया, जन्म, लौकिक कर्म, केवळ कर्म किंवा काम्य कर्म. या मंत्रात असे सांगावयाचे आहे की, जे लोक केवळ कर्मामध्ये रममाण होतात ते अंधकारात जातात. विद्या म्हणजे उपासना किंवा ज्ञान. केवळ विद्येची उपासना करणारा त्याहीपेक्षा दाट अंधकारात जातो. अविद्या म्हणजे प्रवृत्ती. केवळ प्रवृत्ती मार्गाने जाणारा हा अंधकारात जातो. विद्या म्हणजे निवृत्ती. केवळ निवृत्ती मार्गाने जाणारा मनुष्य अधिक अंधकारात जातो. अविद्या म्हणजे अभ्युदय व विद्या म्हणजे केवळ निःश्रेयस. यातील केवळ एकच स्वीकारणे हे अंधकारात जाण्याचे लक्षण आहे.

कित्येकांची उपासनेमध्ये गती नसते. त्यांना वाटते की, केवळ ईश्वराचे नाव घेऊन काय प्राप्त होणार, त्यापेक्षा सतत कर्म करत राहावे. त्यामुळे अशा लोकांची केवळ कर्मावर आसक्ती असते. एका अर्थाने हे लोक केवळ कर्मकांडी व प्रवृत्ती मार्गी होतात. असे लोक भक्तीत रमत नाहीत. चिंतनात मग्न होत नाहीत. जपजाप्यात किंवा नामस्मरणात आवड नसल्यामुळे त्यात गतीही नसते. अंतःकरणात डोकावण्याची इच्छा नसते. मन, बुद्धी, चित्त, अहंकार या अंतःकरण चतुष्ट्याचा ते विचार करत नाहीत. अंतरंगाचा प्रवास किंवा साधना करणे म्हणजे वेळ घालवणे अशी त्यांची धारणा असते. म्हणून हे लोक बहिर्मुखी म्हणजे केवळ बाहेरच्या जगात वावरणारे व रस घेणारे असतात. त्यांच्या दृष्टिने उपासना म्हणजे केवळ वेळ व शक्ती वाया घालवणे असा होतो. त्यामुळे असे कर्ममार्गी लोक उद्घोष करतात, 'कर्म करा, गरिबांना मदत करा, दुर्बलांना अन्न-वस्त्र द्या, निरक्षरांना साक्षर करा. अशासारखे काहीतरी सामाजिक कार्य करा.'

असे लोक निश्चित चांगली कर्मे करतात. त्यांची ईश्वरावर श्रद्धा असो वा नसो, पण चांगल्या कर्माची ते इच्छा करतात. त्यांच्या दृष्टीने कर्म हेच जीवनाचे एकमेव ध्येय असते. पण उपनिषदाला हे मान्य नाही. या मंत्रात हेच सांगितले आहे की, केवळ कर्माने संपूर्ण जीवन विकसित होऊ शकत नाही. चित्तशुद्धीशिवाय केलेली काम्यकर्मे कितीही सात्त्विक असली तरी त्यातून आंतरिक विकास होत नाही.

कारण सर्व प्रकारची कर्मे ही गुणांच्या अधीन असून गुण प्रकृतीच्या स्वाधीन आहेत. त्यामुळे कर्माचरण करून आत्मज्ञान होत नाही. केवळ कर्माच्या



आचरणाने पितृलोक व खूपच पुण्य प्राप्त झाले असता ब्रह्मलोकही मिळेल, पण आत्मज्ञान प्राप्त होणार नाही. असे हे प्रवृत्ती मार्ग स्वीकारणारे एका बाजूला तर दुसऱ्या प्रकारचे निवृत्तीवादी लोक केवळ उपासनेतच रममाण होतात.

या निवृत्ती मार्गी लोकांना कर्मापेक्षा ज्ञान व उपासना श्रेष्ठ वाटते. चित्तशुद्धी ही श्रेष्ठ वाटते. कारण अंतःकरणशुद्धी झाली की, ज्ञान प्रतिष्ठित होते. असे हे केवळ चिंतनात, ध्यानात, उपासनेत रममाण होणारा अंतर्निष्ठ प्रकृतीचा निवृत्ती मार्गी ईश्वरनिष्ठ असतो. विहित कर्माचरण सोडून केवळ देवतांची उपासना करणारा अधिकच अंधकारात जातो. उपासना करून, त्या त्या देवतांना संतुष्ट करून, ते ते देवता लोकसुद्धा मिळतील, परंतु त्यांना आत्मज्ञान प्राप्त होणार नाही. म्हणून उपनिषदाने या दोन्हीही वर्गांची निर्भर्त्सना केली आहे. हे दोन्हीही वर्ग सात्त्विक आहेत, पण उपनिषद म्हणते की, केवळ कर्म करणारे अंधारात जातात व केवळ ज्ञान किंवा उपासनेत रममाण होणारे त्यापेक्षाही दाट अंधकारात जातात. एकाला कर्म अधिक आवडते व दुसरा कर्म पराङ्मुख होतो. एकाचा अहं पुष्ट होतो व दुसरा आत्मसुखात जीवनाची धन्यता मानतो. या २१ व्या शतकात हा वाद अधिकच दृढ व्हायला लागलेला आहे. पाश्चात्त्य विचारसरणी व साम्यवाद यांचा प्रभाव यामुळे एक वर्ग केवळ प्रवृत्तीवादी व्हायला लागला आहे, व दुसरा वर्ग केवळ निवृत्तीवादी होऊन कर्माच्या बाबतीत उदासीन होत आहे. त्यामुळे जगात कर्ममय व अकर्मण्य असे दोन प्रकारचे वर्ग व्हायला लागले आहेत. उपनिषद या दोन्हीही वर्गांना निषिद्ध मानते. विद्याहीन अविद्या व अविद्याहीन विद्या या दोन्हीही अनर्थकारी आहेत, म्हणून एकेकीचा आश्रय घेणे म्हणजे अंधकारात प्रवेश करणे होय.

ही दोन प्रकारची विचारसरणी म्हणजे अभ्युदयवादी व निःश्रेयसवादी. अभ्युदयवादी पुरुषार्थाला श्रेष्ठ समजतात व निःश्रेयसवादी हे परमार्थाला श्रेष्ठ समजतात. हे जग नश्वर आहे, शरीर अनित्य आहे असे समजून, जे ईश्वरतत्त्व श्रेष्ठ आणि नित्य आहे त्याचाच केवळ ध्यास करावा, असे निःश्रेयसवादी म्हणतात. त्यामुळे या लोकांना संसारातील विषयभोग, इंद्रियभोग हे तुच्छ वाटतात, तर अभ्युदयवादी गर्जना करतात की, हे मानवी जीवन अस्थिर व अल्प काळाचे असल्यामुळे जेवढे क्षण मिळतील तेवढे आनंदाने भोग घेऊन जगावे. या जगातले सर्व उपभोग जोपर्यंत आपण जिवंत आहोत तोपर्यंत कसेही करून उपभोगायचे. विषय व भोग हे आमच्यासाठीच आहेत, त्यामुळे ते कसेही करून उपभोगणे यातच जीवनाची इतिश्री आहे, असे यांचे म्हणणे. चार्वाक जसा म्हणतो त्याप्रमाणे 'भस्मी भूतस्य देहस्य पुनरागमन कुतः' -

एकदा या देहाची राखरांगोळी झाली की त्याचे पुन्हा येणे शक्यच नाही. म्हणून जोपर्यंत देह आहे तोपर्यंत सत्ता, संपत्ती, कीर्ती, मान, प्रतिष्ठा, भोगविलास याचाच विचार करू.

या मंत्रात या दोन्ही विचारसरणीचा पराभव केला आहे. निवृत्तीवादी संस्कृतीमुळे मानव पुरुषार्थहीन व अकर्मण्यवादी झाला आहे व प्रवृत्तीवादी संस्कृतीमुळे आशावादी बनून तेजोहीन झाला आहे. या मंत्रात दोन्हींवरही प्रहार केला आहे. दोन्हीही आत्यंतिक टोकाचे मार्ग असल्याने दोघांचाही जीवनविकास होत नाही. कर्म सोडून उपासना करणारा हाही अंधकारात जातो व कर्माची कास धरून अंतःशुद्धी न करता जीवन जगणारा हाही अंधकारात जातो, असे या मंत्रात सांगितले आहे. यातून खरा मार्ग कोणता आहे याची मार्गदर्शन यापुढील मंत्रातून केले आहे. संपूर्ण मानव जातीचा इतिहास या दोन्हीही टोकाच्या विचारसरणींनी भरलेला आहे. काही मानवी संस्कृतीत कधी केवळ अभ्युदयवादी असल्यामुळे ऱ्हास झाला तर काही संस्कृतीत केवळ निःश्रेयसवादीपणामुळे प्रगती होऊ शकली नाही. घड्याळाचा लंबक जसा एका टोकाहून दुसऱ्या टोकाला जातो, पण तोच लंबक एकाच ठिकाणी अडकला तर घड्याळ बंद पडते. तसे या दोन्ही विचारसरणीचे आहे. केवळ एकाच मार्गाचा अवलंब करणारे अंधकारात जातात, हे या मंत्रात सांगितले आहे.

000



## मंत्र दहावा व अकरावा

**अन्यदेवाहुर्विद्यया न्यदाहूरविद्यया ।**
**इति शुश्रुम धीराणां ये नस्तद्विचचक्षिरे ।।१०।।**
**विद्यां चाविद्यां चं यस्तद्वेदोभयँ सह ।**
**अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्यया मृतमश्नुते ।।११।।**

**पदपाठ**

अन्यत् एव आहुः विद्यया अन्यत् आहुः अविद्यया ।
इति शुश्रुम धीराणाम् ये नः तत् विचचक्षिरे ।।१०।।
विद्याम् च यः अविद्याम् च तत् वेद उभयम सह ।
अविद्यया मृत्युं तीर्त्वा विद्यया अमृतम् अश्नुते ।।११।।

**अन्वयार्थ : १०**

विद्यया - ज्ञानाच्या यथार्थ साधनेचे
अन्यत् एव - वेगळेच (फळ)
आहुः - सांगतात (आणि)
अविद्यया - कर्माच्या यथार्थ अनुष्ठानाचे
अन्यत् - वेगळेच (फळ)
आहुः - सांगतात
इति - याप्रमाणे
धीराणाम् - धीरपुरुषांचे
शुश्रुम - वचन आम्ही ऐकले आहे.
ये - ज्यांनी
नः आम्हाला
तत - तत तो विषय
विचक्षिरे - स्पष्टीकरण करून नीट समजावला होता

**अन्वयार्थ : ११**

यः - जो (मनुष्य)
तत उभयम् - त्या दोन्ही (अर्थात्)

विद्याम् - ज्ञानाच्या तत्त्वाला
च - व
अविद्याम् - कर्माच्या तत्त्वाला
च - सुद्धा
सह - बरोबरच (एकाच वेळी)
वेद - खऱ्या अर्थाने जाणतो
सः - तो
अविद्यया - कर्माच्या अनुष्ठानाचे
मृत्युं - मृत्यूला
तीर्त्वा - पार करून
विद्यया - ज्ञानाच्या अनुष्ठानाने
अमृतम् - अमृतम् - अमृतत्त्वाला
अश्नुते - भोगतो, म्हणजे अविनाशी आनन्दमय परब्रह्म पुरुषोत्तमाला प्रत्यक्ष प्राप्त करून घेतो.

**अर्थ : १०**

देवताज्ञानाने एक, तर कर्माने दुसरेच फल मिळते, असे सांगितले आहे, असे आम्ही बुद्धिमंतांकडून ऐकले आहे. त्यांनीच आम्हाला ते समजाविले आहे. ।।१०।।

**अर्थ : ११**

विद्या (देवतांचे ज्ञान) आणि अविद्या (कर्म) या दोन्हींना जो एकाच वेळी जाणतो, तो अविद्येने मृत्यूला पार करून विद्येने अमृततत्त्व मिळवितो. ।।११।।

विहित कर्मांचा आणि केवळ देवतांच्या उपासनेचा उपदेश बुद्धिमंतांनी परंपरेने केला आहे. ज्या लोकांनी तत्त्वज्ञानाचा गाढा अभ्यास केला, अशा धीरपुरुषांनी असे सांगितले आहे की, विद्येचे एक फळ मिळते व अविद्येचे दुसरे फळ मिळते, म्हणजे विद्या व अविद्या यांची स्वतंत्र फळे आहेत, परंतु विद्या व अविद्या यांना एकत्र जो जाणतो व त्यांची उपासना एकत्र जो करतो त्याचे तिसरेच फळ निर्माण होते. अविद्येमुळे त्याला मृत्यूची भीती राहत नाही व विद्येमुळे तो अमृत होतो. दोन्हींची एकत्र उपासना केल्यामुळे ही दोन फळे मिळतात.



या दोन मंत्रांत विद्या व अविद्या यांचे विश्लेषण झाले आहे. ९, १० व ११ या तिन्ही मंत्रांमध्ये हाच विषय मांडला आहे. मागील मंत्रात विशद केल्याप्रमाणे अविद्या व विद्या यांचे तीन प्रमुख अर्थ होतात. अविद्या म्हणजे सकाम कर्म, प्रवृत्ती व अभ्युदय व विद्या म्हणजे उपासना, निवृत्ती व निःश्रेयस. व्यक्ती किंवा समाज हा या तिहींपैकी कोणत्या तरी एकाच्या पाठीमागे धावताना दिसतात. या मंत्रात हे स्पष्ट केले आहे की, यातील प्रत्येकाचे फळ स्वतंत्र आहे.

या तिन्ही अर्थांचे स्पष्टीकरण समजून घेऊन त्याच्या एकत्रित फळाचा विचार केला पाहिजे. सकाम कर्मामुळे फळ मिळेल पण शांती मिळणार नाही व केवळ उपासनेमुळे शांती मिळेल पण ती शांती परिपूर्ण असणार नाही. केवळ कर्म करणारा हा हळूहळू अहंकारी व्हायला लागतो व आत्यंतिक आत्मनिष्ठ होऊन कर्मशील व्हायला लागतो. कर्तृत्व भाव अधिक झाल्यामुळे त्याच्यात अहंगंड निर्माण व्हायला लागतो. तसेच केवळ भक्ती करणारा हा कर्मापासून अलिप्त राहतो त्यामुळे त्याची भक्ती ही तेजस्वी होत नाही. कर्महीन भक्ती दीनदुबळी व रडकी होते. केवळ कर्मामुळे जसा जीवनविकास होत नाही तसे केवळ ज्ञानामुळे विकास साधता येत नाही. केवळ ज्ञानामुळे अनासक्ती येते व कर्म नसल्यामुळे तो जगापासून वेगळा राहतो.

म्हणून या मंत्रात या दोन्हींचीही आवश्यकता सांगितली आहे. कर्मयुक्त उपासना व उपासनायुक्त कर्म असा समन्वय ज्याच्या ठिकाणी झालेला असतो तो खरा ज्ञानी भक्त होतो. वेदांनीसुद्धा अशाच भक्तीची प्रशंसा केली आहे. केवळ राम राम म्हणत बसणे ही वेदांनी सांगितलेली उपासना नव्हे. भक्ती तेजस्वी व्हायला हवी म्हणून असे म्हटले आहे,

**अपहाय निजं कर्म कृष्णकृष्णेति वादिनः ।**
**ते हरेर्द्वेषिनः पापाः कर्मार्थं जन्म यद्धरेः ।**

स्वतःचे विहित कर्म किंवा स्वधर्म सोडून केवळ हरीच्या नावाचा जप करणारे हे हरीचे लाडके होत नाहीत, कारण हरीने आपल्या सर्व अवतारांत मनुष्याने कसे कर्म करावे हे प्रत्यक्ष जगून दाखवले आहे. पूर्ण पुरुष भगवान श्रीकृष्णाने आपल्या अवतार कार्यात ही कर्मे कशी करायची याचा वस्तुपाठ दाखविला आहे. भगवंताला अगतिक, असहाय, दीन अशी भक्ती आवडत नाही. चार भजने गाणे किंवा दोन-चार भक्तांची जीवन चरित्रे वाचणे म्हणजे भक्ती नव्हे. अशा प्रकारची भक्ती दुबळी असते, म्हणून या मंत्रात म्हटल्याप्रमाणे कर्मयुक्त भक्ती व भक्तियुक्त कर्म किंवा ज्ञानप्रधान भक्ती व भक्तिप्रधान ज्ञान असा समन्वय असेल तर मनुष्याचा जीवनविकास निश्चित होईल.

आता विद्या व अविद्या यांचा दुसरा अर्थ समजून घेऊ. विद्या म्हणजे प्रवृत्ती व अविद्या म्हणजे निवृत्ती. काही जण केवळ प्रवृत्तीतच रममाण झालेले असतात तर काही जण केवळ निवृत्तीतच आनंद मानत असतात. प्रवृत्ती म्हणजे सतत कर्मशीलता व निवृत्ती म्हणजे कर्मापासून अलिप्तता. माणसाच्या जीवनात प्रवृत्तीही पाहिजे व निवृत्तीही पाहिजे. जे प्रवृत्ती-निवृत्तीचा समन्वय करतात त्यांच्याच जीवनाचा विकास होतो. प्रवृत्तीचा आधार असलेली निवृत्ती व निवृत्तीचा आधार असलेली प्रवृत्ती ही अधिक शोभून दिसते. प्रवृत्ती मार्गात कितीही धडपडले तरी त्याला आंतरिक समाधान नसते. विषयापासूनचे भोग कितीही भोगले तरी शाश्वत आनंदाची प्राप्ती होत नाही. इच्छा अमर्याद असतात. एक इच्छा तृप्त झाली की, त्या इच्छेच्या पूर्ततेतच दुसरी इच्छा निर्माण होते. इच्छांची शृंखला कधी संपत नाही, तृष्णा कधी मिटत नाही. अखेरच्या श्वासापर्यंत मला हे पाहिजे, मला ते हवे, हा ध्यास सतत सुरूच असतो. अतृप्ती आणि असमाधान हे कधी संपत नाहीत, म्हणून भागवतात ययाती राजाच्या तोंडी खालील श्लोक घातला आहे -

**न जातु कामः कामानामं उपभोगेन श्याम्यती ।**
**हविशा कृष्ण व्रर्त्मेव भूयो एवाभिवर्धते ।।** (भागवत)

'भोग कितीही भोगले तरी तृप्ती कधीही होत नाही. अग्नीत तूप घातल्यानंतर अग्नी जसा भडकतो तशी एक इच्छा तृप्त झाल्यावर दुसरी इच्छा निर्माण होते. इच्छा म्हणजे काम.' ययाती राजाने त्याला मिळालेल्या वरानुसार आपल्या मुलाचे तारुण्य मागून घेतले व तीनशे वर्षे त्याने भोग भोगले व शेवटी वरील सत्य जगाला सांगितले. म्हणून इच्छांना बांध पाहिजे, संयम पाहिजे व कुठे थांबावे हे समजले पाहिजे, यासाठी निवृत्तीची आवश्यकता असते. प्रवृत्ती मार्गात स्वार्थ असेल तरीही समाधान होत नाही व निवृत्ती मार्गात अनिच्छेने अनासक्ती आली असेल तर तिथेही समाधान नसते. म्हणून प्रवृत्ती व निवृत्ती या बुद्धीने स्वीकारल्या पाहिजेत. बाहेरून प्रवृत्ती व अंतःकरणातून सतत निवृत्ती असेल तर मनुष्याला खरे समाधान मिळते व त्याची वाटचाल आत्मोन्नतीकडे होते.

आता अविद्या म्हणजे अभ्युदय व विद्या म्हणजे निःश्रेयस या तिसऱ्या अर्थाचा विचार करू. अनेक लोक इहलोकातील सुख मिळावे यासाठी धडपडत असतात, तर काही लोक वैराग्य व ज्ञान प्राप्त करून आत्मसुखाच्या मागे लागलेले असतात. जीवनात आध्यात्मिकता आली तरच आधिभौतिकतेचा रंग बदलतो. या मंत्रात असे सांगितले आहे की, अभ्युदय व निःश्रेयस हे दोन्हीही मिळवायला हवेत. अभ्युदय हे भगवंताने निर्माण केलेल्या सृष्टीचे



श्रृजन आहे व निःश्रेयस ही भगवंताची स्थिती आहे. वेदांनी हीच गर्जना केली आहे. वेद सांगतात,

**'जीवेम शरदः शतम् । नंदाम शरदः शतम् । मोदाम शरदः शतम् ।'**

वेद म्हणतात की, मनुष्याने कर्म करीत शंभर वर्षे जगावे. हे जगणे आनंदाने असावे. जीवनाकडे पाहण्याची विजिगीषु वृत्ती वेदांनी सांगितली आहे. उपनिषदांनी जीवनापासून पलायन करायला सांगितले नाही. जीवन यशस्वीपणाने कसे जगावे व जीवनाची कृतार्थता कशात आहे, याचे मात्र मार्गदर्शन केले आहे. प्राचीन भारतात आपल्याकडे भौतिकशास्त्राचासुद्धा विकास झाला होता. भौतिकशास्त्र व अध्यात्मशास्त्र यांच्यामध्ये कधीही विरोध नव्हता. ऐहिक जीवनापासून दूर जाऊन पारलौकिक सुखाचा ध्यास करा असे कुणीही सांगितले नाही.

अशा प्रकारे विद्या व अविद्या यांच्या तिन्ही अर्थांचा समन्वय जीवनात झाला तरच मनुष्याला आत्मज्ञान प्राप्त होईल, भगवंतप्राप्तीची दिशा मिळेल व त्याच्या जीवनाचे सार्थक घडू शकेल. म्हणून या दोन्ही मंत्रांत केवळ विद्या व केवळ अविद्या यांचे खंडण केले आहे व या दोन्हींचा सुंदर समन्वय साधण्याचा प्रयत्न केला आहे.

०००

# मंत्र बारावा

अन्धं तमः प्रविश्यन्ति येऽसंभूतिमुपासते ।
ततः भूयः इव ते तमः ये उ संभूत्याम् रताः ।।१२।।

## पदपाठ

अन्धम् तमः प्रविशन्ति ये असंभूतिम् उपासते ।
ततः भूयः इव ते तमः ये उ संभूत्याम् रताः ।।

## अन्वयार्थ

ये - जे लोक
असंभूतिम् - विनाशशील अशा देव - पितर, मनुष्य इ.ची
उपासते - उपासना करतात
(ते) - (ते)
अन्धम् - अज्ञानरूप
तमः - घोर अंधकारात
प्रविशन्ति - प्रवेश करतात (आणि)
ये - जे
संभूत्याम् - अविनाशी परमेश्वरात
रताः - रत राहतात, म्हणजे त्यांच्या मिथ्याभिमान बाळगतात
ते - ते
ततः उ - त्यांच्याहूनही
भूयः इव - जणू काही अधिक
तमः - अंधकारात
प्रविशन्ति) - (प्रवेश करतात)

## अर्थ

जे असंभूतीची (अव्यक्त प्रकृतीची) उपासना करतात, ते घोर अंधकारात शिरतात व जे संभूतीत (कार्यब्रह्म-हिरण्यगर्भ) रमतात, ते तर अधिकच अंधकारात प्रवेश करतात. ।।१२।।



जे केवळ अव्यक्त प्रवृत्तीची उपासना करतात ते अंधारात प्रवेशमान होतात, त्याचप्रमाणे जे कारणरूप ब्रह्माची उपासना करतात तेसुद्धा अंधारात प्रवेश करतात. जे प्रकृतीची उपासना करतात त्यांना प्रकृतीलयरूप फळ मिळते. प्रकृतीचा लय झाला असता त्रिविध ताप आणि दुःख भयादी चिंता उरत नाही. असे असले तरी त्यांना आत्मानंद प्राप्त होत नाही. जे संभूतीची म्हणजे हिरण्यगर्भाची उपासना करतात ते अनात्म प्राणालाच आत्मा मानतात. प्राण हा तर केवळ जडरूप वायू आहे. अशा प्राणाची उपासना करणारा हा जडाचीच उपासना करीत असल्यामुळे तो आणखीन अंधारात जातो. या मंत्रात असंभूतीचा शब्दशः अर्थ हिरण्यगर्भ म्हणजे व्यक्त असा होतो. याचे उलट संभूती ही संज्ञा अव्यक्त प्रकृती अशा अर्थाने उपयोजिली आहे. संभूती व असंभूती या दोन शब्दांच्या अर्थासंबंधी एकमत नाही. मागील मंत्रात विद्या व अविद्या यांचा समन्वय साधणारी उपासना सांगितली. या मंत्रात उपनिषद संभूती व असंभूती यांची उपासना सांगितली आहे.

कित्येक लोक सत्य विश्वातच रममाण झालेले असतात व त्यामुळे त्यांचे जीवन ध्येयहीन असते. ते फक्त वर्तमानाचाच विचार करतात. मृत्यूनंतरचा विचार करायला त्यांना वेळच नसतो. दुसऱ्या प्रकारचे लोक केवळ उद्याचा विचार करीत कल्पनामय विश्वात रममाण झालेले असतात. म्हणून या मंत्रात श्रुति सांगते की, केवळ संभूती किंवा केवळ असंभूतीचा विचार करणारे दोघेही अंधकारात जातात.

केवळ व्यक्त शक्तीची किंवा अव्यक्त शक्तीची उपासना त्याज्य आहे असे या मंत्रात म्हटले आहे. सृष्टीतल्या अव्यक्त शक्तीची उपासना करणारे असंभूतीवाले होत व सृष्टीतल्या व्यक्त शक्तीची उपासना करणारे संभूतीवाले होत. असंभूतीवाले शक्तिरूप मायेची उपासना करीत असतात. वैज्ञानिक हे सृष्टीत असलेल्या अव्यक्त शक्तीचे उपासक आहेत. शास्त्रज्ञांनी या शक्तीचे संशोधन केले आहे. अनेक शोध लावले, पण या अव्यक्त असलेल्या शक्तीपेक्षा दुसरी एक श्रेष्ठ आत्मिक शक्ती आहे याची या लोकांना कल्पनाच नाही. म्हणून हे लोक अंधकारात जातात तर दुसऱ्या प्रकारचे लोक प्रभूच्या मायेचाच विचार करतात. त्यांना माया काय आहे हेही कळलेले नसते व भगवंताचे स्वरूपही समजलेले नसते. त्यामुळे अशा लोकांना सृष्टीत रस वाटत नाही. त्यामुळे असे लोकसुद्धा अंधकारात प्रवेश करतात. असंभूती म्हणजे सृष्टीतील अव्यक्त शक्ती व संभूती म्हणजे दृष्य जगाच्या पाठीमागे असलेली शक्ती. या दोन्ही शक्तींचा विचार व्हायला हवा. या दृष्य जगाच्या मुळाशी एक शक्ती आहे, त्या शक्तीचा शोध करायला हवा व तिला ओळखायला हवे. असंभूती

म्हणजे जे निरोधांत घडून गेले तेही गाढ अंधारात गेले व जे विकासात रमले तेही जणू गाढ अंधकारात गेले. असंभूती म्हणजे निरोध करणारे. असे लोक इंद्रिय निरोधही करतात. अनेक व्रतवैकल्ये करतात, उपासतापास करतात, जपजाप्य करतात. हे सगळे करूनही ते आंतरिक शक्तीचा विचार करीत नाहीत. मनाला दिव्य, भव्य, उदात्त करण्यासंबंधी प्रयत्न करत नाहीत. परमेश्वराविषयी त्यांची अशी विचारधारा असते की, ईश्वर हा सृष्टी निर्माण करत नाही. अशी श्रद्धा असल्यामुळे असे लोकही अंधकारात जातात. यापेक्षा संभूतीवाले ईश्वरावर श्रद्धा ठेवतात व त्यांची ईश्वराविषयी दृढधारणा अशी असते की, तो सृष्टीचा उत्पादक आहे. हे जरी त्यांना पटलेले असले तरी ईश्वर हा सृष्टीचा संहारकर्ता व विनाशक आहे असे ते मानीत नाहीत. म्हणून असे लोकही अंधकारात जातात. असंभूती म्हणजे सृष्टीतील अव्यक्त शक्ती व संभूती म्हणजे दृष्य जगाच्या पाठीमागील शक्ती. या दोन्हींचा समन्वय साधल्याशिवाय जीवनाचा विकास होत नाही, म्हणून या पुढील १३ व १४ या मंत्रांमध्ये उपनिषदकारांनी या समन्वयाचा विचार केला आहे.

000



## मंत्र तेरावा व चौदावा

अन्यदेवाहुः संभवादन्यदाहुरसंभवात् ।
इति शुश्रुम धीराणाम् ये नस्तद्विचचक्षिरे ।।१३।।

संभूतिं च विनाशं च यस्तद्वेदोभयम् सह ।
विनाशेन मृत्युं तीर्त्वा संभूत्यामृतमश्नुते ।।१४।।

**पदपाठ : १३**

अन्यत् एव आहुः संभवात् आन्यत् आहुः असंभवात् ।
इति शुश्रुम धीराणाम् ये नः तत् विचचक्षिरे ।।

**पदपाठ : १४**

संभूतिम् च विनाशम् च यः तत् वेद उभयम् सह ।
विनाशेन मृत्युम् तीर्त्वा संभूत्या अमृतम अश्नुते ।।

**अन्वयार्थ : १३**

संभवत् - अविनाशी ब्रह्माच्या उपासनेचे
अन्यात् एव - वेगळेच फळ
आहुः - सांगितले आहे (व)
असंभवात् - विनाशशील देव - पितर-मनुष्य इ.च्या उपासनेचे
अन्यत् - वेगळेच फळ
आहुः - सांगितले आहे
ये - ज्यांनी
नः - आम्हाला
तत् - तो काय
विचचक्षिरे - स्पष्टीकरण करून नीट समजावला होता
(तेषां) धीराणाम् - त्या धीर पुरुषाकडून
इति - ह्याप्रमाणे
शुश्रुम - आम्ही ऐकले आहे

## अन्वयार्थ : १४

यः - जे
तत् उभयम् - त्या दोन्ही (अर्थात्)
संभूतिम् - अविनाशी परमेश्वराला
च - आणि
विनाशम् - विनाशशील देवादिकांना
च - सुद्धा
सह - एकाचवेळी
वेद - खऱ्या अर्थाने जाणतात
सः - ते
विनाशेन - विनाशशील देवादिकांच्या उपासनेने
मृत्युं - मृत्यूला
तीर्त्वा - तरून जाऊन
संभूत्या - अविनाशी परमेश्वराच्या उपासनेने
अमृतम् - अमृतत्वाला
अश्नुते - भोगतात म्हणजे अविनाशी आनंदमय परब्रह्म पुरुषोत्तमाला प्रत्यक्ष प्राप्त करतात

## अर्थ : १३

कार्यब्रह्माच्या (हिरण्यगर्भाच्या) उपासनेने एक, तर अव्यक्ताच्या उपासनेने दुसरेच फल मिळते, असे सांगितले आहे. बुद्धिमंतांनी हे आम्हास समजावून सांगितले असून त्यांच्याकडूनच ते आम्ही ऐकले ।।१३।।

## अर्थ : १४

जो असंभूती (जिला जन्म नाही, अशा अव्यक्तप्रकृती) आणि कार्यब्रह्म (ज्याला विनाश आहे असा हिरण्यगर्भ) यांना एकाच वेळी जाणून त्यांची उपासना करतो, तो कार्यब्रह्माच्या उपासनेने मृत्यूला पार करून असंभूतीच्या उपासनेने (प्रकृतिलयरूप) अमरत्व मिळवतो. ।।१४।।

बाराव्या मंत्रात संभूती व असंभूती यांचे वेगवेगळे अर्थ आपण पाहिले. तेराव्या मंत्रात या शब्दांबद्दल संभव आणि असंभव या दोन शब्दांची योजना झाली आहे. केवळ संभूतीने किंवा केवळ असंभूतीने मनुष्याचा विकास होत नाही, कारण उभयविद बौद्धिक साधनेहून आत्मज्ञान वेगळी वस्तू आहे व या



दोन्हींचे फळ वेगवेगळे आहे, असे धीरपुरुषांकडून सांगितले गेले आहे. चौदाव्या मंत्रात असंभूतीसाठी विनाश हा शब्द वापरलेला आहे. त्या आधी असंभूती म्हणजे निरोध व संभूती म्हणजे विकास असे दोन अर्थ आपण पाहिले. विनाश या पर्यायी शब्दाने निरोधाचाच अर्थ प्रगट झाला आहे. या निरोधाचे दोन भाग आहेत. (१) नवीन दोष चिकटू न देणे व (२) जुनेच चिकटलेले दोष काढून टाकणे. असंभूती शब्दातून अक्षरार्थाने मुख्यतः पहिला भाग सूचित होतो. दुसरा भाग सुचविण्यासाठी विनाश शब्द वापरला आहे. योगदर्शनकारांनी निरोध शब्दात दोन्ही भागांचा समावेश केला आहे. 'पातंजलीनी योगाची व्याख्या करताना, 'योगः चित्तवृत्ती निरोधः ।' म्हटले आहे. इथे निरोध शब्दात दोषांचा संपूर्ण विनाश अपेक्षित आहे म्हणून उपनिषदाने विनाश शब्द वापरला आहे. श्रृतिने असंभूतीच्या ठिकाणी विनाश या शब्दाची योजना केली आहे.

व्यक्त व अव्यक्त उपासनेचे फळ सांगणारे हे मंत्र आहेत. संभूती व असंभूतीची उपासना केली असता त्याने मिळणारी फळे अविद्यात्मक असल्याने नाशवंतच असतात. प्रकृती गुण व प्राणांचे अधिष्ठान हे सर्वच विनाशाकडे जाणारे असतात. ज्याचे कार्य विनाशी असून अधिष्ठान नाशवंत असते तो कर्ताही नाश पावणार हे स्पष्टच आहे. कार्यब्रह्म म्हणजेच हिरण्यगर्भाची उपासना केली असता त्याला दारिद्र्यरूप मरण टाळता येते. या दोन्हीही उपासनांना एकाचवेळी जाणून त्यांची जो उपासना करतो त्याला हे फळ मिळते तसेच प्रकृतिलयस्वरूप अमरत्वही प्राप्त होते.

जीवनात निरोध आणि विकास दोन्हीही असले पाहिजे. चित्तवृत्तीचा निरोध म्हणजे चित्तवृत्तीचे उदात्तीकरण, केवळ निरोध नव्हे. केवळ निरोधाने काही काळ वृत्ती बदलते व अनुकूलता प्राप्त झाली की मूळची वृत्ती पुन्हा उफाळते. म्हणून निरोध आणि विकास यांचा एकाचवेळी उपयोग झाला पाहिजे. निरोध आणि विकास यांचा समन्वय साधूनच मानवी जीवनाचा विकास होऊ शकतो, हे या मंत्रात स्पष्ट केले आहे. काही लोक केवळ समाजकार्य करून जगाचे भले करायला जातात. त्यांच्याकडे भक्ती नसते व अहंकाराने ते पुष्ट झालेले असतात. दुसऱ्यांना दुबळे समजून त्यांचे भले करण्यासाठी जणू काही आपल्यावरच उत्तरदायित्व आलेले आहे असे समजून स्वतःचा अहंभाव फुलवीत असतात. तर दुसऱ्या प्रकारचे लोक या जगाला प्रभूची माया ठरवून जगाकडे दुर्लक्ष करीत असतात. ते जगाचे भलेही करायला मागत नाहीत. त्यामुळे उपेक्षेने ते जगाकडे पाहतात. या दोन्हीही प्रकारच्या लोकांचे दृष्टिकोन एकांगी आहेत. म्हणून असंभूती आणि संभूती याचा समन्वय साधून आणि

परमेश्वराची माया ओळखून स्वतःची शक्ती जगत् कल्याणासाठी जो वापरतो तो शहाणा.

निरोध आणि विकास हे दोन्ही एकत्र आले नाहीत तर मानवी जीवनाचा विकास होत नाही. केवळ निरोधाने शारीरिक आणि मानसिक दौर्बल्य येते. अनेकांना निरोध म्हणजे धर्म असेच वाटते. अनेक गोष्टींचा त्याग करणे यातच ते स्वतःला धार्मिक समजतात. व्रतवैकल्य व कठोरपणाने इंद्रियांचे दमन करणे यातच ते स्वतःला धन्य समजतात. निरोधातच भक्ती सामावलेली आहे असे त्यांना वाटते, म्हणून केवळ निरोधाने आत्मज्ञान प्राप्त होत नाही. आत्मतत्त्व प्राप्त होण्यासाठी मनुष्याने दोन्हीही गोष्टींचा एकाचवेळी विचार केला पाहिजे. माणसाने व्यक्त आणि अव्यक्त अशा दोन्ही शक्ती जाणून घेतल्या पाहिजेत.

असंभूती व संभूती यांच्या दुसऱ्या अर्थाचाही आपण विचार करू. असंभूती म्हणजे आंतरिक क्रिया आणि संभूती म्हणजे बाह्यक्रिया. आंतरिक स्थिती बदलल्याशिवाय बाहेरील स्थिती बदलत नाही. बाह्यक्रियेशिवाय आंतरिकक्रिया अमूर्त पाहते आणि आंतरिकक्रियेशिवाय बाह्यक्रिया फुलत नाही. केवळ अंतःप्रेरणा असेल आणि बाह्यक्रिया नसेल तर अंतःप्रेरणा निष्प्राण होते आणि केवळ बाह्यक्रिया असेल व अंतःप्रेरणा नसेल तर बाह्यक्रिया जड होते. म्हणून केवळ सद्विचार किंवा सत्प्रवृत्ती अंतःकरणात असून चालत नाही तर ती बाह्याचरणात व कृतीत असली पाहिजे. दोन्ही प्रकारच्या लोकांमध्ये एकांगीपणा दिसतो, पण अंतःप्रेरणा आणि बाह्याचरण यात सुसंगती असेल तर जीवनविकास निश्चित होतो. म्हणून अंतःप्रेरणा घेऊन उदात्त ध्येय बाळगून प्रयत्नशील असणारा हा आत्मविकास साधत असतो.

असंभूती म्हणजे भावनामय विश्व किंवा कल्पनामय विश्व आणि संभूती म्हणजे सत्य विश्व. काही जण केवळ कल्पनामय जगतातच वावरत असतात. ते सत्य विश्वाची उपेक्षाच करतात. मोठमोठी ध्येये बाळगायची पण त्याप्रमाणे वाटचाल करायची नाही अशा निष्क्रिय लोकांना भगवंत तरी कसे बळ देईल? तसेच निश्चित ध्येय नाही व वारेमाप प्रयत्न मात्र आहेत अशा वेळी फलप्राप्ती पूर्णपणे साध्य होत नाही. म्हणून प्रयत्नरहित ध्येय खोटे असते व ध्येयरहित प्रयत्न खोटा असतो. म्हणून भावनामय विश्व व सत्यमय विश्व या दोहोंचाही जोडूनच विचार केला पाहिजे. अंतःकरणात दैवीविचार घेऊन, चित्ताची शुद्धता करून अंतरंग समृद्ध केले पाहिजे व बाह्याचरणात कर्तृत्व, कार्यक्षमता व प्रयत्न असले पाहिजेत. केवळ उदात्त संकल्प करून चालत नाही तर तो संकल्प पूर्ण करण्यासाठी कठोर तप पाहिजे. सत्य संकल्प पूर्ण करण्यासाठी



अंतःकरणाची शुद्धता व दुर्दम्य प्रयत्न या दोन्हींची आवश्यकता आहे. म्हणून अंतरंग आणि बहिरंग ह्या दोन्हींत जर समन्वय असेल तर विकास निश्चित आहे व या दोन्हींकडे ध्यान नसेल तर विनाश अटळ आहे.

निरोध आणि विकास, अंतःप्रवृत्ती आणि बहिःप्रवृत्ती तसेच असंभूती आणि संभूती या दोन्हींचाही समन्वय झाला पाहिजे. भगवंताने निर्माण केलेल्या जगाला आपले मानले पाहिजे व त्या भगवंतावरसुद्धा दृढ विश्वास असला पाहिजे. ईश्वरावरील श्रद्धेमुळे आपल्या सामाजिक कार्यातसुद्धा निःस्वार्थता येते. हे सर्व प्रभूच्या शक्तीने घडत असल्यामुळे आपण केवळ निमित्तमात्र आहोत अशी धारणा झाल्यामुळे त्याच्यात अहंभाव शिरत नाही. हे सर्व असे एकत्र आले तर अमृततत्त्वाची प्राप्ती होते. आणि हे जर झाले नाही तर अमृतप्राप्तीसाठी अडचणी येणारच. या अडचणींचे स्वरूप कसे आहे ते यापुढील मंत्रात सांगितले आहे.

000

## मंत्र पंधरावा

**हिरण्मयेन पात्रेण सत्यस्यापिहितं मुखम् ।**
**तत्त्वं पूषन्नपावृणु सत्यधर्माय दृष्टये ।।१५।।**

### पदपाठ

हिरण्मयेन पात्रेण सत्यस्य अपिहितं मुखम् ।
तत् त्वम् पूषन् अपावृणु सत्यधर्माय दृष्टये ।।

### अन्वयार्थ

(हे) पूषन् - हे सर्व पोषक प्रभो
सत्यस्य - सत्य स्वरूप अशा तुमचे
मुखम् - मुख
हिरण्मयेन - ज्योतिर्मय सूर्यमंडलरूप सुवर्णमय
पात्रेण - पात्राने
अपहितम् - झाकलेले आहे
सत्यधर्माय - आपल्या भक्तिरूपी सत्यधर्माचा उपासक अशा मला
दृष्टये - आपले दर्शन व्हावे ह्यासाठी
तत् - त्या आवरणाला
त्वम् - आपण
अपावृणु - दूर करा (ते आवरण काढून टाका)

### अर्थ

हे विश्वप्रेषक प्रभो, सुवर्णाप्रमाणे तेजस्वी अशा पात्राने आदित्यमंडलाच्या ठिकाणी असलेल्या ब्रह्माची उपासना हाच ज्याचा धर्म आहे, अशा माझ्यासाठी तू त्याचे मुख उघड कर. ।।१५।।

मागील मंत्रात संभूती व असंभूती, विद्या व अविद्या यांचा विचार केला. आता हे उपनिषद एक कटू सत्य सांगत आहे. मृत्युसमय जवळ आल्यानंतर



अशी प्रार्थना होते पण साधना करीत असताना हे सत्य जर समजले तर भगवंताचे स्वरूप जाणायला ते अधिक सोपे ठरते.

'सोन्याच्या पात्राने सत्यस्वरूप, ब्रह्म दडले असून ते स्वरूप मला जाणावयाचे आहे. आतापर्यंत तुझी उपासना करूनही हे आत्मस्वरूप मला जाणता आले नाही. ते आता सत्यस्वरूप तूच मला आता दाखव,' ही भगवंताजवळ केलेली मागणी आहे. आत्मा सत्यकाम व सत्यस्वरूप आहे. मग असा अनुभव साधकाला का येत नाही. या सत्यस्वरूपाला ओळखायचे असेल तर नेमकी अडचण कोणती, हे या मंत्रात सांगितले आहे. आत्म्याचे सत्यकामत्व या सुवर्णमय पात्राने झाकलेले आहे. संत तुकाराम म्हणतात त्याप्रमाणे '**काम, क्रोध, आड पडले पर्वत । राहिला अनंत पलिकडे ।।**' किंवा ज्ञानेश्वर महाराज नवव्या अध्यायात म्हणतात,

**तैसा हृदयामध्ये मी रामू । असता सर्व सुखाचा आरामू ।।**
**किम् भ्रांतासि कामू । विषयावरी ।।**

हा सत्यस्वरूप परमेश्वर आत्मस्वरूपाच्या रूपाने याच हृदयामध्ये अवस्थित आहे तरीसुद्धा त्याची अनुभूती साधकाला येत नाही. मोह, लोभ, क्रोध अशा नानाविध विकारांनी त्या अमृतावर आवरण घातले आहे. म्हणून या अमृताचे दर्शन होत नाही. अनेक मोहांनी मनुष्य हा मूढ बनला आहे. रमणीय अशा भोगांनी त्याचे मन चलित झालेले असते. हिरण्मयपात्र हा शब्द या मंत्रात जो योजिला आहे, त्याला हाच अर्थ प्राप्त आहे. अक्षरार्थाने तो वित्तमोह सुचविणारा आहे. या हिरण्मयपात्राचा अर्थ गीतेमध्ये योगमाया या अर्थाने आला आहे. ईश्वर योगमायेने वेढल्यामुळे किंवा आच्छादित असल्यामुळे तो सर्वांना प्रकट दिसत नाही. म्हणून गीता सातव्या अध्यायात म्हणते,

**दैवी ह्येषा गुणीमय मम माया दूरत्यया ।**
**मामेव ये प्रपद्यन्ते मायामेतां तरन्ति ते ।।१४।।**

'गुणात्मक अशी ही माझी दिव्य माया दुस्तर आहे. म्हणून जे मलाच शरण येतात ते या मायेला तरून जातात.'

ही भगवंताचीच माया आहे. त्यालाच संपूर्ण शरणागत होऊन ही माया दूर होईल. केळाचा कोंब हा जसा अनेक पापुद्र्यांनी वेढलेला असतो, त्याचा एकेक पापुद्रा दूर केल्यानंतर शेवटी त्या कोंबाचे दर्शन होते. आत्मस्वरूपरूपी सत्यावर भोगांची, विकारांची, अज्ञानाची अशी अनेक आवरणे असतात. अशी ही सत्याचे मुख झाकणारी आवरणे दूर करणे हीच साधना. अशी ही पाने रमणीय व मोहकारक असतात. कठोर साधनेशिवाय या सुवर्णमयी आवरणाला दूर करता येणे शक्य नाही.

हिरण्मयपात्र म्हणजे प्रभूची माया. प्रभूच्या या सामर्थ्यशाली मायेमुळे आतील सत्य झाकले गेले आहे. सत्ता, संपत्ती, कीर्ति, पद, प्रतिष्ठा यामध्ये जीवनातील प्रत्येक क्षण हा जगत असतो. प्रपंचाचे आकर्षण शेवटच्या क्षणापर्यंत त्याला सोडवत नाही. वस्तूंची गोळाबेरीज करण्यात सारे आयुष्य निघून जाते. सुखासाठी बाह्यवस्तूंवर अवलंबून असल्यामुळे आज ही वस्तू, उद्या ती वस्तू असा वस्तुसंग्रह करण्यातच आयुष्य निघून जाते. बंगला, दागिने, गाडी अशा वस्तूंसाठी आटापिटा करावा लागतो, रक्ताचे पाणी करावे लागते. विषय वस्तूमुळे मिळणारे सुख हे क्षणिक सुख आहे, तो सुखाचा आभास आहे, असे जेव्हा कळते, त्या वेळी पुरते आयुष्य निघून गेले असते. कस्तुरीमृग सुगंधासाठी दाहीदिशांना पळत असतो. पण त्याला सुगंधाचा ठावठिकाणा कळत नाही. सुगंध मात्र येत असतो. खूप पळतो, थकतो व कोलमडतो. कोलमडल्यानंतर जेव्हा कस्तुरीमृगाचे नाक त्याच्या बेंबीपर्यंत पोचते त्या वेळी त्याला सुगंधाचा पत्ता लागतो. स्वर्गीय आनंद देणारा तो सुगंध आपल्याच बेंबीत आहे याची जाणीव होते, पण थकल्यामुळे प्राण मात्र निघून गेलेले असतात. मनुष्याच्या जीवनाची शोकांतिका ही अशीच आहे. सुख सुख म्हणून शेवटपर्यंत सुखाचा शोध घेत असतो, पण सुखाचा झरा अंतःकरणातच आहे, तो आनंदस्वरूप सत्याचा ठेवा अंतःकरणातच दडला आहे याची जेव्हा जाणीव होते त्या वेळी आयुष्य बरेच निघून गेलेले असते. हीच भगवंताची माया! म्हणून ही माया दूर करण्यासाठी या मंत्रात प्रार्थना केली आहे.

जीवनात प्रभूचे दैवीगुण आले पाहिजेत. हे गुण जेवढे येतील तेवढी ही आवरणे दूर होतील. प्रभूचे गुण म्हणजेच दैवीगुण. ज्ञान, यश, श्री, वैराग्य, औदार्य व ऐश्वर्य या गुणांनी ते सत्यस्वरूप तेजाळलेले आहे. ईश्वराचे गुण अनंत आहेत. साधकाच्या प्रकृती स्वभावानुसार या तेजस्वी स्वरूपाचे जे रूप त्याला भावते ते रूप तो स्वीकारतो. कोणी निर्गुण शाखा की, जी ईश्वराला सत्य किंवा सत्यपर्यायरूप संज्ञेने संबोधते. दुसरी सगुण शाखा जिला प्रेम किंवा प्रेमपर्यायरूप संज्ञा गोड वाटतात. एक शुद्ध ज्ञानाची शाखा व दुसरी शुद्ध भक्तीची शाखा. उपनिषदात या दार्शनिक विचारांचा प्रभाव असल्यामुळे सत्यम् ब्रह्म अशी व्याख्या केली आहे. अशा या निर्गुण ब्रह्माची प्राप्ती सगुणाच्या आधारानेच म्हणजेच प्रेममय उपासनेने करावी, असे उपनिषदांचे सांगणे आहे. मनुष्य विकारवान असल्यामुळे निर्विकारतेकडे नेण्यासाठी त्याला ईश्वराचे सगुणमय व प्रेममय स्वरूप उपयोगी पडते. या सत्याला पूषण म्हणजे विश्वपोषक ही संज्ञा देऊन सत्य आणि प्रेम यातील भेदच मिटविला आहे. हा परमेश्वर सत्याहून वेगळा नाही. सत्यच तो आहे. सत्य म्हणजे ईश्वर व ईश्वर म्हणजे



सत्य. महात्मा गांधींनी याच सत्यरूपी ईश्वराची साधना केली. याच सत्यासाठी जगातील अनेक महामानवांनी प्रचंड त्याग केला. प्रसंगी आपले बलिदानही केले. सॉक्रेटीसचे उदाहरण प्रसिद्ध आहे. विवेकनिष्ठेच्या बळावर सॉक्रेटीस उभा राहिला. राजसत्तेला न आवडणारे बोलून सॉक्रेटीसने मृत्यूचाही स्वीकार केला. वेद म्हणजे विवेकनिष्ठा. या विवेकनिष्ठेच्या अधिष्ठानावर उभे राहून लोकांनी सत्यधर्माची उपासना केली. सत्य म्हणजे आत्मा, ब्रह्म आदी शाश्वत सत्ये. ही सर्व सत्ये या मोहमयी आवरणांनी झाकलेली असतात. प्रभूच्या मायेमुळेसुद्धा हे आत्मस्वरूप झाकले आहे. ज्याने प्रभूला शरणागत होऊन ही प्रार्थना केली, तोच या सत्यस्वरूपापर्यंत पोहोचू शकतो. या गुणमयी मायेला, भगवंताला पूर्णपणे शरण गेल्याशिवाय जिंकता येत नाही. मायेला जिंकल्याशिवाय सत्यस्वरूप ईश्वराचे दर्शन होत नाही.

हा मंत्र तेजस्वी आहे, मांगलिक आहे, यात ईश्वराची प्रार्थना सांगितली आहे. ईश्वराला आवाहन केले आहे, 'ज्या सुवर्णपात्रात तू लपला आहेस त्याचे झाकण दूर कर. सत्यस्वरूप, धर्मस्वरूप अशा तुझ्या दर्शनासाठी मी उत्कंष्ठीत झालो आहे. तू मला दर्शन दे. तू जगाचा एकटा पोषणकर्ता आहेस. तू जगात एक सर्वसाक्षी आहेस. तू जगाचा एक नियंता आहेस. जीवनदाता आहेस, पालनकर्ता आहेस. हे ईश्वरा, तू आपले किरण विस्तारून मला दर्शन दे. तुझे ते तेजोमय, कल्याणमय रूप मला दिसू दे.' अशी प्रार्थना फलद्रूप झाली की, जीवन कृतार्थ होते. मग या जीवनात मिळविण्यासारखे काही राहत नाही.

000

# मंत्र सोळावा

**पूषन्नेकर्षे यम सूर्य प्राजापत्य**
**व्यूह रश्मीन्समूह ।**
**तेजोयन्ते रूपं कल्याणतमं**
**तत्ते पश्यामि**
**योऽसावसौ पुरूषः सोऽहमस्मि ।।१६।।**

## पदपाठ

पूषन् एकर्षे यम सूर्य प्राजापत्य व्यूह रश्मीन् समूह ।
तेजः यत् ते रूपम् कल्याणतमम् तत् ते पश्यामि यः
असौ एसौ पुरूषः सः अहम् अस्मि ।।

## अन्वयार्थ

पूषन् - हे भक्तांचे पोषण करणाऱ्या
एकर्षे - मुख्य ज्ञानस्वरूप
यम - सर्वांचे नियमन करणाऱ्या
सूर्य - भक्त किंवा ज्ञान्यांचे लक्ष्यरूप
प्राजपत्य - प्रजापतिला प्रिय असणाऱ्या प्रभो!
रश्मीन् - ह्या तुझ्या किरणांना
व्यूह - एकत्र कर किंवा दूर हटवा
तेजः - ह्या तेजाला
समूह - समेटून घ्या किंवा आपल्या तेजांत मिसळून घ्या
यत - जे
ते - आपले
रूपम - दिव्यस्वरूप आहे
तत् - त्या
ते - आपल्या दिव्यस्वरूपाला
पश्यामि - मी आपल्या कृपेने ध्यानद्वारा पाहत आहे
यः एसौ - हा जो (सूर्याचा आत्मा) आहे
असौ पुरूषः - तो परात्पर पुरुष (आपलेच) स्वरूप आहे
अहम् - मी (सुद्धा)
सः अस्मि - तोच आहे.



## अर्थ

हे विश्वपोषका सूर्या, एकट्यानेच भ्रमण करणाऱ्या, हे विश्वनियामका (रस व प्राणांचे पोषण करणाऱ्या) सूर्या, प्रजापतिच्या पुत्रा, तुझे अतिशय कल्याणकारक रूप माझ्या दृष्टीस पडावे व आदित्यमंडळातील पुरुष मीच आहे (ही जाणीव व्हावी), म्हणून तू आपले किरण आवरते घे. ।।१६।।

इथे या मंत्रात सूर्यप्रतीकात ईश्वराचे ध्यान करावयाचे आहे. जो अंतर्यामी सूर्याचा प्रेरक आहे तोच माझ्या बुद्धीचा प्रेरक आहे. सूर्य आणि बुद्धी ही दोन्ही आवरणे समजावीत मंत्राच्या पहिल्या दोन चरणात प्रार्थना समाप्त झाली आहे 'रश्मिन् व्यूह, रश्मिन्समूह' असे प्रार्थनेचे दुहेरी वाक्य आहे. त्यानंतर भक्ताची प्रार्थना ऐकून त्याला दर्शन दिले असे समजावयाचे आहे. तिसऱ्या चरणात हे दर्शन वर्णिले आहे. चौथ्या चरणात दर्शनाने लाभलेली अनुभूती वर्णन केली आहे. या चारही चरणांत परिपूर्ण ध्यान मांडले आहे. प्रार्थना व नंतर दर्शन आणि प्रतीती मिळून ध्यान पूर्ण होत असते. दर्शन होत नाही तोपर्यंत दर्शनाऐवजी भावना आणि प्रतीतीऐवजी प्रीति राखून ध्यानपूर्ती करायची असते.

या मंत्रात प्रभूचे वर्णन आहे. रश्मि म्हणजे किरण. या मंत्रात प्रभूजवळ मागणी केली आहे की, प्रभो, तुझे तेज एकत्र कर, तुझे किरण व्यवस्थित कर. तिसऱ्या चरणात, 'प्रभूदर्शन हे प्रार्थनेचे फळ सांगितले आहे' व चौथ्या चरणात हे दर्शन झाल्यावर ती दैवीशक्ती मीच आहे अशी अनुभूती येईल याचे वर्णन आहे. साधना, प्रार्थना योग्य तऱ्हेने जर झाली तर ईश्वरदर्शन होते. ईशावास्योपनिषदातला भगवत् रूपाचे वर्णन करणारा हा शेवटचा श्लोक आहे. जग व जगदीश्वर यांच्यासंबंधी असलेल्या विचारांचा हा श्लोक आहे. या श्लोकात प्रार्थनेमुळे दर्शन व दर्शनाने प्रतिति होते हे प्रतिपादन केले आहे. प्रार्थनेत पाच विशेषणे आहेत व प्रभूची विशेषता वर्णन केली आहे. पूषण, एकर्षे, यम, सूर्य व प्राजापत्य ही पाच विशेषणे होत. ही विशेषणे जर वृत्तीरूप झाली तर प्रभूदर्शन होते.

पूषण म्हणजे पोषक. या जगाचे पालन-पोषण करणारा तोच आहे. भगवंताने गीतेत याचे वर्णन केले आहे. ते म्हणतात -

**गामाविश्य च भूतानि धारयाम्यहमोजसा ।**
**पुष्णामि चौषधीःसर्वाःसोमो भूत्वा रसात्मकः ।।१३।।** (अ.१५)

'पृथ्वीमध्ये प्रवेश करून आणि रसात्मक चंद्र होऊन सर्व औषधींचे म्हणजे वनस्पतींचे पोषण करीतो' याच भगवंताचे तेज, चंद्र-सूर्यात आहे. तेच जगाला

प्रकाशित करते. चंद्र, सूर्य व अग्नीत जे तेज आहे ते माझेच तेज आहे असे समज, असे भगवंत सांगतात. भगवान सर्वांचा पोषक आहे त्याचे हे वर्णन आहे. शेतात चार दाणे आपण पेरतो व त्याचे चारशे दाणे भगवंत देतो. ज्या पाण्यात अमृततत्व आहे ते पाणी त्याच्याच कृपेने प्राप्त होते. पाणी म्हणजे जीवन. पोषण करणारे हे सर्व घटक भगवंताच्या कृपेनेच प्राप्त होतात. अस्ति जायते, वर्धते, विपरी णमते, अपक्षियते व शेवटी क्षियंते अशा सहा अवस्थांमध्ये मनुष्यासह सर्वच प्राणिमात्रांचा आणि वनस्पतींचासुद्धा जीवनक्रम असतो. शेतात बीजरूपाने ज्वारी पेरल्यानंतर त्या बीजाला अंकुर येतो, अंकुर वाढतो व त्याला कणसे येतात, कणसे काढल्यानंतर वाढलेले रोप हळूहळू सुकायला लागते व सुकलेले रोपटे वाऱ्याच्या झोताने कधीतरी खाली पडते. हे जसे आहे तसेच मनुष्याचा गर्भात असताना जीव किती सूक्ष्म असतो, जन्माला आल्यानंतर तो किती लहान असतो, त्याच जीवाला नंतर कोमार्य, यौवन, प्रौढपण आणि शेवटी वृद्धावस्था प्राप्त होते. एवढ्या सूक्ष्म जीवाच्या या सर्व अवस्थांमध्ये त्याचे सर्वतोपरी पोषण भगवंतच करतो. बीजाचे रोपट्यामध्ये जसे रूपांतर होते तसे हा जीव पाच-सहा फूट वाढतो. भगवंत म्हणतात की, मी वैश्वानररूप अग्नी होऊन प्राण्यांच्या देहात राहिलो असून, प्राण व अपान यांनी युक्त झालेला असा मी चार प्रकारचे अन्न पचन करतो. (अ. १५ - १४) वैश्वानररूपात असणारा भगवंत जोपर्यंत मनुष्याच्या शरीरात असतो तोपर्यंत या शरीराचे चलनवलन होत असते. पण तो शरीरातून निघून गेला की सर्व इंद्रिये त्याच जागी असूनसुद्धा ती निष्प्राण आणि थंड होतात. जोपर्यंत अंशरूपाने त्याचे अस्तित्व शरीरात असते तोपर्यंत सर्व इंद्रिये काम करीत असतात. जोपर्यंत चिन्मय आत आहे तोपर्यंत हे मृण्मय शरीर हालचाल करते. सर्व संतांना या आतल्या ईश्वरीशक्तीचे दर्शन झाले, त्याची अनुभूती आली म्हणून संत ज्ञानेश्वर म्हणतात,

**'या उपाधी माजी गुप्त । चैतन्य असे सर्व गत ।**
**ते तत्वज्ञ, संत । स्विकारीती ।।'**

शरीर ही उपाधी आहे. तसेच वस्तुमात्र जगत हीसुद्धा उपाधी आहे. या उपाधीमध्ये हे चैतन्य गुप्तरूपाने राहिल्यामुळेच जीवनशक्ती आहे, म्हणूनच तत्त्वज्ञ आणि संत ते स्वीकारतात पण अज्ञानी माणसाला त्याची प्रतीती येत नाही. संत तुकाराम याच भाषेत म्हणतात, 'कोणाचिये सत्ते चाले हे शरीर' असे विचारून त्याचे उत्तरही ते देतात, 'आपुलिया बळे नाही बोलवत । सखा कृपावंत वाचा त्याची ।।' मनुष्याच्या बुद्धीत येणारे विचार या चैतन्यस्पर्शाशिवाय असूच शकत नाहीत म्हणून भगवंत हा विचार पोषकसुद्धा आहे. या विचाराप्रमाणे तो आपल्या भाववृत्तीचादेखील पोषक आहे. भावनांशिवाय मनुष्याचे जीवन



पशुतुल्य आहे. भाव नसेल तर जीवनातल्या मोठ्या आनंदाला मुकावे लागते. मनुष्याच्या जीवनातील तीन-चतुर्थांश भाग हा भावजीवनाने व्यापलेला आहे. श्रद्धा व भावना मनुष्याच्या जीवनात भावानंद वाढवतात. या जर भावना नसतील आणि प्रचंड साधनसामग्री जरी असेल तरी त्याला दुर्दैवी म्हटले पाहिजे. अशा मनुष्याच्या हृदयातील आनंदाचा झरा पूर्णपणे आटलेला असतो. भावनाशून्य व भक्तिहीन, श्रद्धाहीन असे ज्याचे जीवन आहे, त्याचे वर्णन श्री ज्ञानेश्वर माऊलींनी नवव्या अध्यायातील एका ओवीत केले आहे,

**माझिये भक्तिविण । जळो ते जियालेपण ।।**
**अगा पृथ्वीवरी पाषाण । नसती काई ।।**

भावनाशून्य मनुष्याचे जीवन म्हणजे पाषाणासारखेच असते. पाषाण जसा निर्जीव तसा तोही प्राण असून निष्प्राण असल्यासारखा. म्हणून भावनात्मक जीवन हेच खरे जीवन आहे आणि अशा भावनेचे पोषण करणारा तोच भगवंत आहे. म्हणून या मंत्रात त्या भगवंताला पूषण म्हणून हाक मारली आहे.

यानंतर भगवंताला एकर्षे असे म्हटले आहे. एकर्षे याचा अर्थ कर्मयोगी, निरीक्षक व दार्षनिक असा होतो. भगवान महान कर्मयोगी आहेत. सर्व कर्मे करूनसुद्धा भगवंत सर्वातून अलिप्त आहेत. कर्म केलेच पाहिजे असे बंधन नसताना ते सतत कर्मशील असतात. अनासक्त बुद्धीने व समदृष्टी ठेवून सर्वांचे पालनपोषण करण्यासाठी कर्म करीत असतात. सूर्य हे त्याचे प्रतीक आहे. तो महान कर्मयोगी आहे. कुठेही भेदाभेद न करता तो सतत प्रकाश देत असतो आणि काहीही अपेक्षा न ठेवता असा जो कर्माच्या ठिकाणी निष्ठा ठेवून सतत कर्म करीत असतो तोच खरा कर्मयोगी आहे. एकर्षे शब्दाचा हा एक अर्थ. दुसरा त्याचा अर्थ म्हणजे निरीक्षक! प्रभू सर्वज्ञ आहे. त्याच्या इच्छेशिवाय जगातील कोणतीही गोष्ट घडत नाही. झाडाचे पानसुद्धा त्याच्या सत्तेशिवाय हालत नाही. प्रभू मनुष्याच्या पाप-पुण्याचे निरीक्षण करणारा आहे. भगवंताच्या दृष्टीतून मनुष्याचा कोणताही अपराध सुटत नाही. त्याचे उत्कर्षाचेही तो निरीक्षण करतो व त्याच्या अधःपतनाचेसुद्धा त्याला ज्ञान असते. तो सर्वसाक्षी आहे, द्रष्टा आहे. या सृष्टीत घडणाऱ्या प्रत्येक लहानसहान गोष्टींची त्याला जाणीव आहे. मनुष्याच्या अंतःकरणात जेव्हा दैवीगुण उद्भवतात तेव्हा तो केवळ निरीक्षक किंवा द्रष्टा राहत नाही. नंतर भगवंताच्या भूमिका अशा श्रेष्ठ साधकामध्ये बदलत असतात, तो त्याचा भगवंत अशा मनुष्याच्या ठिकाणी भर्ता, भोक्ता, अनुमंता अशा भूमिकांमध्ये त्याच्याशी एकरूप होतो. म्हणून तो निरीक्षक आहे तसाच तो दार्षनिकही आहे. जीवनाचे दर्शन तोच घडवून आणतो, त्यामुळे ता सर्वज्ञ आहे.

०००

## मंत्र सतरावा व अठरावा

**वायुरनिलममृतमथेदं भस्मान्तँ शरीरम् ।**
**ॐक्रतो स्मर कृतँ स्मर क्रतो स्मर कृतँ स्मर ।।१७।।**

**अग्ने नय सुपथा राये अस्मान्विश्वानि देव वयुनानि विद्वान् ।**
**युयोध्यस्मज्जुहुराणमेनी भूयिष्ठां ते नम उक्तिं विधेम ।।१८।।**

**पदपाठ**

वायुः अनिलम् अमृतम् अथ इदम् भस्मान्तम् शरीरम् ।
क्रतो स्मर कृतम् स्मर क्रतो स्मर कृतम् स्मर ।।
अग्ने नय सुपथा राये अस्मान् विश्वानि देव वयुनानि विद्वान ।
युयोधि अस्मत् जुहुराणम् एनः भूयिष्ठाम् ते नम उक्तिम् विधेम ।।

**अन्वयार्थ : १७**

अथ् - आता
वायुः - प्राण व इंद्रिये
अमृतम् - अविनाशी
अनिलम् - (प्रविशतु) - समष्टि वायुतत्त्वात (प्रविष्ट होवोत)
इदम् - हे
शरीरम् - स्थूल शरीर
भस्मान्तम् - (भूयात्) अग्नीमध्ये जळून भस्मरूप होवो
क्रतो - हे सच्चिदानन्दघन यज्ञमय भगवान!
स्मर - आपण माझे भक्ताचे स्मरण करा
कृतम् - (माझ्या हातून झालेल्या) कर्माचे
स्मर - स्मरण करा

**अन्वयार्थ : १८**

अग्ने - हे अग्नीच्या अधिष्ठात्या मार्गदर्शक प्रभो!
अस्मान् - आम्हाला
राये - परमधनरूप परमेश्वराची सेवा करण्यास जाण्यासाठी



वयुनानि - कर्मांना
विद्वान् - जाणणारे आहात (म्हणून)
अस्मत् - आमच्या
जुहुराणम् - ह्या मार्गात प्रतिबंधक जी
एनः - (आमची) पापे (असतील त्या सर्वांना)
सुपथा - सुंदर (शुभः (उत्तरायण) मार्गाने
नय - घेऊन जा
देव - हे देवा (आपण आमच्या)
विश्वानि - संपूर्ण
युयोधि - तुम्ही पळवून लावा
ते - तुम्हाला
भूयिष्ठाम् - पुनःपुन्हा
नम उक्तिम् - नम्र वाणीने
विधेम - (आम्ही) विनवीत आहोत, वारंवार नमस्कार करीत आहोत

**अर्थ : १७**

आता माझे प्राण वायुरूप सूत्रात्म्यामध्ये एकरूप होवोत आणि हे स्थूल शरीर भस्मरूप होवो. संकल्प करणाऱ्या मना, स्मरण करण्यास योग्य असे ते अग्निरूप ब्रह्म, त्याचे स्मरण करः केलेल्या कर्मांचे स्मरण कर. ।।१७।।

**अर्थ : १८**

हे अग्ने! कर्मफलभोगरूप धनप्राप्तीसाठी मला सन्मार्गाने घेऊन चल. हे देवा! तू माझ्या सर्व विद्या व कर्मे जाणणारा आहेस. माझी कुटिल पापे नष्ट कर. आम्ही तुला वारंवार नमस्कार करतो. ।।१८।।

सतराव्या मंत्रात व अठराव्या मंत्रात अंतःकाळची साधना सांगितली आहे. वायू एक महाभूत असून तो देहात प्राणापानादि दहा प्रकारचा कार्यानुरूप असतो. देहातील मर्यादित वायूचे ब्रह्मांडातील सूत्ररूप अशा आधिदैव वायूबरोबर आता ऐक्य होवो. येथे वायुप्रतीकात ईश्वराचे ध्यान करावयाचे आहे. वायू म्हणजे प्राण. हा प्राण त्या चैतन्यमय अमृततत्त्वात लीन होवो आणि मग शरीराची राख होवो. म्हणजे शरीरातील ती ती तत्त्वे त्यांच्या मूळ देवतात लीन होवोत, असा याचा व्यापक अर्थ आहे. अनिल शब्द अन् म्हणजे 'हालचाल

करणे' या धातूवरून बनलेला आहे. वायू म्हणजे जीव, प्राण हा जीव चैतन्यमय परमात्म तत्त्वात मिसळून जावो. या मंत्रातील अमृतम् शब्द मागे अकराव्या व चौदाव्या मंत्रामध्ये आला आहे. तेथे तो मोक्षवाचक असून येथे ईश्वरासाठी योजला आहे. दोन्ही मिळून अर्थ एकच आहेत. अमरत्व हे चैतन्याचे लक्षणच आहे. सर्व मर्त्य गोष्टींचा नाश होऊन जे अखंड राहते ते चैतन्य. 'भस्मांतम् शरीरम्' हा दहनविधीचा उल्लेख आहे. देहादी पार्थिव स्वरूपाचे सर्व काही पूर्ण निःशेष व्हावे व त्याचे स्मरणसुद्धा नाहीसे व्हावे अशी साधकांची पवित्र तळमळ आहे. या मंत्रातील अथः म्हणजे नंतर. आधी जीव परमात्म्यात मिसळून जावो आणि मग देहाची राख होवो, नाहीतर जीवभाव कायमच राहून नुसत्या दहनविधीची क्रिया जर झाली तर प्राणाला ऊर्ध्वगती प्राप्त होणार नाही. आतापर्यंत केलेले कर्म व उपासनारूप, देवतारूप ज्ञान हे सूक्ष्म शरीराशी आता एकरूप झाले आहे. असा बाहेर पडलेला लिंगदेह कर्मानुसार गती पावून अनेक प्रकारच्या लोकांत जाऊन पुण्य संपेपर्यंत भोग भोगतो. स्थूल देह तेवढा मागे राहतो. त्याला अग्नीने जाळला असता पृथ्वी तत्त्वरूप भस्म शिल्लक राहते.

सतराव्या मंत्राच्या दुसऱ्या ओळीत ओंकार स्वरूप अग्नीला आवाहन केले आहे. ओम् हे ईश्वरनाम आहे. तिन्ही वेदांचे ते सार आहे. अनेक उपनिषदांत त्याचे विविध प्रकारे वर्णन केले आहे. योगसूत्रानी जपासाठी ओंकारच सुचविला आहे. दहाव्या मंत्रातील 'तत्', पंधराव्या मंत्रातील 'सत्य' आणि या मंत्रातील 'ओम्' ही तिन्ही ईश्वरनामे आहेत. ती ईश्वराच्या स्वरूपाचे तीन प्रकारे वर्णन करणारी आहेत. ओम् हे शुभाशुभ दोन्ही स्वीकारणारे, तत् शुभाशुभांच्या पलीकडचे आणि सत्य किंवा सत् हे केवळ शुभदर्शन. गीतेतील सतराव्या अध्यायामध्ये 'ओम् तत् सत्' हा ब्रह्मनिर्देश योजिला आहे. जीवाकडून जन्मजन्मांतरी अनेक शुभाशुभ संकल्प रचले गेले. ते सर्व विसरले जावेत त्यासाठी ही अंतिम प्रार्थना आहे. ओंकारच हे सर्व शुभाशुभ स्वीकारेल व त्याला योग्य गती देईल. जीवाला येथे ऋतू म्हणजे संकल्प या शब्दाने संबोधिले आहे. जीव स्वरूपाचे हे नेमके व समर्पक वर्णन आहे. संकल्प म्हणजेच जीव व संकल्परहित भाव होणे म्हणजे शिवमय होण्याची साधना. 'ओमकृतस्मर कृत स्मर कृतस् स्मर' याचा अर्थ, 'हे ओंकार स्वरूप अग्ने, मी जे जे आजवर केले ते ते आठव. अशा रीतीने कर्मानुसार लिंगदेह आपला मार्ग धरण्याच्या काळी साधक पुनःपुन्हा अग्नीला याचना करतो की, 'हे देवा! अग्निनारायणा, मला दुःखस्वरूप दक्षिणमार्गाने न नेता सन्मार्ग दाखवा. मोक्षाचे स्वरूप ह्या मंत्रात परिपूर्ण मांडले आहे. देहाची संपूर्ण राख व्हावी हा



पहिला भाग व दुसऱ्या भागात प्राणादि सूक्ष्म तत्त्वे त्या त्या देवतात लीन व्हावीत. तिसऱ्यात ईश्वरचिंतनाने संकल्प छेदला जावा व शेवटी जीव परमात्म्यात मिसळावा. अंतःकाली ईश्वरस्मरण घडण्याची अशी इच्छा होण्यासाठी संपूर्ण जीवन हे त्या परमतत्त्वाचे स्मरण करण्यात गेले पाहिजे. असे जर झाले तरच अंत्यसमयी ईश्वराचे स्मरण सुलभ होते. जो अंतःकाळी माझेच स्मरण करीत देह सोडतो तो माझ्याच स्वरूपाला येऊन पोहोचतो यात संशय नाही, असे भगवंत गीतेच्या आठव्या अध्यायातील पाचव्या श्लोकात म्हणतात. असे जर झाले नाही तर त्याला कोणती गती मिळते त्याचे वर्णन सहाव्या श्लोकात केले आहे. भगवंत म्हणतात की, जन्मभर त्यातच रंगून गेल्यामुळे मनुष्य ज्या ज्या भावाचे स्मरण करीत अखेरीस देह सोडतो तो मनुष्य त्या त्याच भावाला पुढे जाऊन पोचतो. जन्मभर जे मनात असते ते मरणकालीही सुटत नाही, केवळ मृत्यूच्या वेळी भगवंताचे नाम किंवा भाव मनात येणे शक्य नाही, म्हणून जन्मभर परमेश्वराचे स्मरण व उपासना करण्याची आवश्यकता सिद्ध केली आहे. भगवान श्रीकृष्ण म्हणतात -

**तस्मात्सर्वेषु कालेषु मामनुस्मर युध्य च ।**
**मय्यर्पितमनोबुद्धिर्मामेवैष्यस्यसंशयम् ।।७।।**

'म्हणून सर्व काली म्हणजे नेहमीच माझे स्मरण करीत जा, आणि युद्ध कर. माझ्या ठायी मन व बुद्धी अर्पण केलीस म्हणजे (लढाई करूनही) मलाच येऊन पोचशील, यात संशय नाही.' या मंत्रात यासाठीच केलेल्या कर्माचे स्मरण करायला सांगितले आहे. जे जे तू चांगले केलेले असशील त्याचे स्मरण कर, तेच तुझ्याबरोबर येणार आहे, असे जीवाला म्हटल्यानंतर अग्नीलाही हाक मारली आहे, 'हे अग्ने! तू जात वेदस् आहेस. तू सर्व जाणतोस. मी जे काही चांगले केले त्याचे स्मरण कर व मला वैभवाकडे घेऊन जा.'

ही मनुष्याच्या अंतःकाळाची साधना आहे. जन्मभर पवित्र निर्मळ जीवन जगून उपासनेमध्ये जीवन व्यतीत केल्याशिवाय असे वैभव प्राप्त होत नाही. म्हणून अठराव्या मंत्रामध्ये अग्नीला आवाहन केले आहे. येथे अग्निप्रतीकात ईश्वराचे ध्यान करावयाचे आहे. जो मनुष्याच्या शरीरामध्ये अग्नीच्या रूपाने राहिलेला आहे, ज्याला गीतेने वैश्वानररूप अग्नी म्हटले आहे, तोच साऱ्या ब्रह्मांडाचा नायक आहे. जीवनातील सर्व महत्त्वाची कार्ये अग्निसाक्ष करण्याची वैदिकांची पद्धत होती. त्यानुसार ह्या मंत्रात अग्नीपाशी चारित्र्य प्रार्थना केली आहे. अग्नी हा त्याच्या प्रकाशकत्वामुळे ज्ञानस्वरूपही कल्पिला आहे. म्हणून वेदात त्याला 'जात वेदस्' असे म्हटले आहे. एकूण अग्नी म्हणजे विश्वरूपाने व्यक्त झालेला, विश्वाचे तत्त्व जाणणारा, विश्वाला मार्गदर्शक सगुण साकार परमेश्वर होय.

'अग्ने नय सुपथा राये' याचा अर्थ, 'हे अग्ने, कर्मफल भोगरूप धनप्राप्तीसाठी मला सन्मार्गाने घेऊन चल.' या मंत्रात अस्मान या शब्दाची योजना केली आहे. मागच्या दोन मंत्रांत एकवचनी प्रयोग आहे व इथे या शब्दाने याला सामुदायिक प्रार्थनेचे स्वरूप आले आहे. चारित्र्य साधना ही सामुदायिक होऊ शकते व तशी ती झाली पाहिजे. सामुदायिक केल्यानेच ती पूर्णही होते. म्हणूनच संतांनीसुद्धा, 'एकमेका साह्य करू अवघे धरू सुपंथ' असे म्हणून सामुदायिक साधनेचा मंत्र दिला आहे. म्हणून या देवाकडे पुन्हा अशी प्रार्थना केली आहे, 'हे देवा! तू माझ्या सर्व विद्या व कर्मे जाणणारा आहेस, माझी कुटिल पापे नष्ट कर. आम्ही तुला वारंवार नमस्कार करतो.'

'युयोधी' म्हणजे दूर कर, असा अर्थ सांगितला आहे व 'जुहुराणमेन' म्हणजे वाकडे जाणारे पाप असा अर्थ व्यक्त होतो. ज्याने केवळ विहीत कर्माचरण केले आहे त्याने दक्षिण पंथाने जाऊन कृतकर्माची फळे भोगून जन्ममरणाच्या फेऱ्यात पुन्हा आले पाहिजे. ज्याने कर्म व उपासना ही दोन्हीही केली आहेत त्याला उत्तर पंथाने हिरण्यगर्भ लोकात प्रवेश मिळून यथाकाल क्रममुक्ती मिळते. जो पापाचरण करतो व उपासनाही करीत नाही त्याला यमलोकात अनंत यातना भोगाव्या लागतात व एखाद्याने आत्मज्ञान जर प्राप्त केले तर तो कर्मबंधनातून सुटून त्याला मोक्षही प्राप्त होऊ शकतो. अशी ही ईश्वरीयोजना आहे. या मंत्रातील प्रार्थनेत ईश्वराला, त्या सर्वज्ञाला विनंती केली आहे की, माझ्या हातून जे काही पाप घडले असेल व त्यामुळे जी अधोगती मला प्राप्त होणार आहे ते सर्व दूर करून मला ऊर्ध्वगतीला ने. आता आयुष्यातील शेवटचा क्षण येऊन ठेपला आहे. इंद्रिये शिथिल झाली आहेत, तुझी सेवा करण्यास आता शक्ती राहिली नाही. तू दयेचा सागर आहेस. तुला मी वारंवार नमस्कार करतो.

या शेवटच्या मंत्रात मानवाची अंतिम साधना सांगितली आहे. त्यात वायू व अग्नी यांना हाक मारली आहे. 'हे अग्ने देवा, ज्याने मला फिरून परतावे लागणार नाही अशा चांगल्या मार्गाने घेऊन चला. ज्या मार्गाने गेल्यास जन्म-मृत्यूच्या चक्रात पुनःपुन्हा सापडावे लागते तो दक्षिण मार्ग मला आता अजिबात नको.' हे सांगण्यासाठी सुपथः हे विशेषण वापरले आहे. केवळ परब्रह्माच्या अपरोक्ष अनुभूतीनेच जन्म-मरणाचा फेरा चुकतो. भगवद्‌गीतेत भगवंतांनी या संदर्भात स्पष्ट म्हटले आहे,

**आब्रह्मभुवनाल्लोकाः पुनरावर्तिनो र्जुन**
**मामुपेत्य तु कौंतेय पुनर्जन्म न विद्यते ।।१६।।**



'हे अर्जुना, ब्रह्मलोकासह स्वर्गादि जे लोक आहेत त्या साऱ्या लोकांतून केव्हा ना केव्हातरी पुन्हा जन्म घ्यावा लागतो, पण हे कौंतेया, जे मला येऊन मिळाले त्यांना मात्र पुन्हा पुनर्जन्म नाही. म्हणून असे अमृततत्त्व आम्हाला प्राप्त व्हावे. ह्या मंत्रातल्या अग्नीच्या प्रार्थनेत साधकाने अशी मागणी केली आहे की, माझ्या चांगल्या कर्माचे तू स्मरण कर व मला या अमृतमय चैतन्याकडे घेऊन चल. माझ्या आध्यात्मिक विकासाला प्रतिबंध करणारे पाप दूर कर. माझी सर्व कर्मे मी तुला समर्पण केलेली आहेत यापेक्षा मनुष्य म्हणून मी आणखी काय करणार? म्हणून तू आता आमचे हे अज्ञानरूपी पापाचे बीजच नष्ट करून टाक. स्वस्वरूपाविषयीचे अज्ञान हेच मूळ पाप आहे. आपण देहच आहोत या भ्रान्तरूपी अज्ञानातूनच सर्व पापांची उत्पत्ती होते. म्हणून अज्ञानाचे बीजच तू नष्ट करून टाक. यासाठी मी तुला वारंवार नमस्कार करतो.

शेवटचा क्षण असा गोड व्हावा, जीवन असे मुक्त व्हावे यासाठी सबंध आयुष्याची साधना हवी. संपूर्ण जीवन हे शुचिर्भूत हवे यासाठी आरंभापासूनच निर्धार हवा, आरंभापासूनच आपली आपणास शिकवण हवी, 'हे जीवा, त्या परममंगल प्रभूचे स्मरण कर. त्याच्या गुणांचे व त्याच्या लीलांची आठवण करून त्याप्रमाणे आचरण कर. ईश्वर हा सर्वज्ञ आहे. तो आपल्या अंतर्यामात वसत असल्यामुळे आपल्या पाप-पुण्याला तो जाणणारा आहे,' यासाठी त्याच्याकडे ही सतत प्रार्थना करायची आहे की, 'हे प्रभो, तू मला सदाचाराकडे, सन्मार्गाकडे घेऊन चल. माझ्या हातून जेव्हा पाप घडेल असे वाटेल तेव्हा तूच मला त्यापासून दूर कर.'

या दोन्ही मंत्रातून मृत्यूच्या मंगलमय अशा रूपाचे स्वरूप वर्णन केले आहे. जसे जीवन समजते तसा मृत्यूही समजला पाहिजे. मृत्यू म्हणजे शेवट नव्हे तर मृत्यू हा पुढील जीवनाच्या प्रवासाचा आरंभ आहे. मृत्यूमुळेच या जीवनात उत्साह आहे. झाडावरून पिकलेले पान किंवा पिकलेले फळ जसे अलगद पडते तसा मृत्यूसुद्धा आला पाहिजे. मृत्यू आहे म्हणूनच मनुष्य जीवनात आनंद व रस आहे. मृत्यू अटळ असल्यामुळे त्या अंतिम क्षणाचीसुद्धा साधना व्हायला हवी. शेवटचा क्षण गोड व्हायचा असेल तर जीवनभर शुद्ध आचरणाने, श्रद्धेने आपला आत्मविकास करून घ्यायला पाहिजे. हातून सत्कर्मे घडली पाहिजेत. अशी सत्कर्मे घडली असतील तर अंतिमक्षणी मनुष्य मृत्यूचे स्वागत करतो व धैर्याने मरणाची तयारी करतो. हातून जर पापकर्मे घडली असतील तरच त्याला मृत्यूची भीती वाटते. वास्तविक मरण म्हणजे जीवाने

भगवंताला भेटणे होय, आपल्या मूळ निजधामाकडे जाणे होय. जसा आपण शरीरावरचा कपडा बदलावा तसा आत्मादेखील जुने शरीर फेकून देऊन नवे शरीर धारण करतो. भगवंत हा आपला खरा पिता आहे, त्याला भेटायला जाण्याचा क्षण म्हणजे मृत्यू. हे भेटायला जाणे आनंदाचे होण्यासाठी साधनेची आवश्यकता आहे. म्हणून मृत्यूनंतरच्या वैभवाकडे घेऊन जाण्यासाठी ही प्रार्थना आहे. या दोन शेवटच्या मंत्रांत उपनिषदाने मानवाला शेवटची ज्ञानसाधना समजावली आहे. हे मंत्र समजल्यानंतर मृत्यूकडे धैर्याने पाहण्याची वृत्ती व शक्ती निर्माण झाली पाहिजे.

ईशावास्योपनिषदातील या सर्व अठरा मंत्रांत जीवनाचे महान तत्त्वज्ञान विशद झाले आहे. हे एक पूर्ण उपनिषद आहे. पारमार्थिक जीवनातील विकासाची परिपूर्ण मांडणी या छोट्याशा उपनिषदात झाली आहे. या अठरा मंत्रांचे विहंगावलोकन थोडक्यात करू.

यातील पहिल्या मंगलमय मंत्रात ईशनिष्ठा, ईश्वराची व्यापकता व ईशदर्शन सांगितले आहे. भोग कसे भोगावेत हे सांगून जीवनाकडे पाहण्याचा दृष्टिकोन समजावला आहे. 'वासुदेवम ईदं सर्वम्' हे सांगून समर्पणयोग समजावला आहे.

दुसऱ्या मंत्रात कर्मनिष्ठा सांगितली आहे. अनासक्तबुद्धीने कर्मे करून ती भगवंताला अर्पण केल्यामुळे ती पवित्र होतात. आपली कर्मे, समाजाची कर्मे व भगवंताची कर्मे असे तीन भाग यात केले आहेत. निरंतर कर्मे करीत राहून जशा प्रकारचे जीवन भगवंत आपल्याला देईल ते आम्ही आनंदाने जगले पाहिजे.

तिसऱ्या मंत्रात ईश्वरनिष्ठा व कर्मनिष्ठा विसरून केवळ भोगप्रधानवृत्ती राखणाऱ्या लोकांना याच जीवनात नरकप्राय वेदना भोगाव्या लागतील, असे सांगितले आहे. या आत्महन लोकांना मरणानंतरसुद्धा अशीच पापमय व नरकमय स्थिती भोगावी लागेल, यासाठी सावधान केले आहे.

चौथ्या मंत्रात ईशशक्तीचे गुणवर्णन केले आहे. ही शक्ती अलौकिक व अमर्याद आहे म्हणून तिची उपासना सांगितली आहे.

पाचव्या मंत्रात या चित् शक्तीचे स्वरूप सांगितले आहे. तो अनिर्वचनीय, विषयातीत व अकर्मा आहे, असे असूनही तो सर्व कर्मे करतो. म्हणून अशा ईशशक्तीवर संपूर्ण श्रद्धा ठेवून जीवन जगण्याचा मंत्र इथे सांगितला आहे.



यानंतर सहा, सात व आठ या तीन मंत्रांत ईश्वरभक्तांचे वर्णन आले आहे. ही सुंदर सृष्टी म्हणजे ईश्वराचा अद्‌भुत आविष्कार आहे. म्हणून या सृष्टीत जगताना साधकांना कंटाळा येत नाही. असा साधक आपपरभाव विसरून स्वतःत सर्वांना पाहतो व सर्वांत आपल्याला पाहतो. त्यामुळे यांना कशाचाच शोक व मोह राहत नाही. आपपरभाव व द्वेष-मत्सर गेल्यामुळे असे भक्त आनंदाने जीवन जगत असतात. अशा ज्ञानी भक्तांचे वर्णन या मंत्रात आहे.

नऊ, दहा व अकरा या तीन मंत्रांत बुद्धीचे कार्य सांगितले आहे. नवव्या मंत्रात मानव जीवनातील द्वंद्वाचे वर्णन आहे. या द्वंद्वात प्रवृत्ती, निवृत्ती, निरोध-विकास, कर्म-उपासना अशा प्रकारच्या द्वंद्वाचे वर्णन आहे. या जगात अमर्याद ज्ञान आहे. या सगळ्या ज्ञानाची आपल्याला गरज नाही. गरजेच्या आणि बिनगरजेच्या ज्ञानाचा विवेक करायला आपण शिकले पाहिजे. बुद्धी ही मनुष्याला मिळालेली देणगी आहे. या बुद्धीनेच जीवनातील संघर्ष सहयोगात्मक कसा होईल हे पाहिले पाहिजे. म्हणून बुद्धी, ईश्वरपरायण करून साक्षीरूप भावाने या द्वंद्वाकडे पाहिले पाहिजे तरच आपण विकास साधू शकतो.

बारा, तेरा व चौदा या मंत्रांत अंतःकरण शुद्धीचे महत्त्व विशद केले आहे. जशी शुद्ध बुद्धीची विकासाला आवश्यकता आहे तशी हृदयातील दोष काढून टाकून चित्तशुद्धी करणेही आवश्यक आहे. म्हणून गुणांचा विकास केला पाहिजे व दोषांचे निराकरण केले पाहिजे. गुण-दोषाहून आपण भिन्न आहोत हे ओळखून जीवनात सर्व ठिकाणी साक्षीरूप राहण्याचा अभ्यास केला पाहिजे.

पंधराव्या मंत्रात, भगवंताजवळ जायचे असेल तर कोणत्या अडचणी येतात, याचे वर्णन आले आहे. या महान मंत्रात दर्शनाचे सार आहे. मोहाच्या आवरणाने सत्य लपले आहे. हे मोहाचे आवरण दूर केल्याशिवाय सत्याचे दर्शन होत नाही. अनेक प्रकारचे मोह आहेत, त्यांना हिरण्मयपात्र म्हणजेच सोन्याचे झाकण असे म्हटले आहे. हे सोन्याचे झाकण दूर केल्याशिवाय ईश्वराचे म्हणजे सत्याचे दर्शन होणार नाही.

सोळाव्या मंत्रामध्ये भगवान पोषक, पालक, नियामक, निरीक्षक व सर्जक अशा पाच प्रकारचा आहे, हे सांगितले आहे. या सृष्टीचे तो नियमन करतो. ईश्वर व मी यात भेदाभेद नाही. मी त्याचाच अंश आहे. त्याच्या व माझ्यात दूरत्व निर्माण करणारे जे सुवर्णपात आहे ते दूर करायचे आहे. हे दूर झाले तर ईश्वराचे दर्शन मी माझ्यात घेऊ शकतो. सोहम् मंत्राने हे आश्वासन या मंत्रात दिले आहे. तेजोमय भगवंताच्या ज्ञान व प्रकाश किरणांनी सोहम्ही प्राप्त करून घ्यायची आहे.

सतरा व अठरा या मंत्रांत मनुष्याची अंतिम साधना सांगितली आहे. अंतिम क्षण सुखाचा होण्यासाठी आमरण साधना केली पाहिजे, हे या मंत्रात सांगितले आहे. अठरावा मंत्र ही देवाची प्रार्थना आहे. ईश्वराला मार्गदर्शक अग्नीच्या रूपात पाहिले आहे. अग्निस्वरूप चैतन्यदायी देवाची प्रार्थना करताना सन्मार्गाने नेण्याचे आवाहन केले आहे. वाकड्या मार्गाने न नेता सरळ मार्गाने जगण्यासाठी आम्हाला बळ दे, अशी या मंत्रात प्रार्थना केली आहे. या मंत्रात मृत्यूच्या मंगलमय स्वरूपाचे वर्णनही आले आहे.

o o o o o



# ईशावास्योपनिषद

## लेखक - परिचय


नाव : प्रा. दत्तात्रय नारायण दुभाषी

जन्म : १९ जानेवारी १९४१ बेळगांव

शिक्षण : १) एम. ए. (इंग्रजी - संस्कृत)
२) एम. ए. (मराठी)

व्यवसाय : पत्रकार व माध्यमिक शिक्षक म्हणून १० वर्षे व महाविद्यालयीन प्राध्यापक म्हणून ३० वर्षे अशी एकूण ४० वर्षे सेवा. गोपाळकृष्ण गोखले कॉलेज, कोल्हापूर येथून इंग्रजी विभागप्रमुख म्हणून निवृत्त.

छंद व आवड :

- सतत भ्रमण - ५ वेळा अमेरिका-कॅनडा येथे प्रदीर्घ वास्तव्य. युरोप-मिडलईस्ट इ. ठिकाणचा प्रवास.
- वक्तृत्व - नाट्य - लेखन यांच्या विशेष आवडीमुळे वर्तमानपत्रे व मासिकांतून अनेक विषयांवर व्याख्याने व लेखन.
- निसर्गात पदभ्रमणाची विशेष आवड.
- योग-प्राणायाम यावर प्रबोधन - व्याख्याने व प्रात्यक्षिके.

सामाजिक कार्य :

- श्री ज्ञानेश्वरी, तुकाराम गाथा अशा संतसाहित्यावर व भगवद्गीतेवर गेली १५ वर्षे सतत प्रवचने व व्याख्याने यातून समाजप्रबोधन.
- गीता व ज्ञानेश्वरी यावरील लेखमाला प्रसिद्ध.
- अध्यात्म व तत्त्वज्ञान याचा प्रचार व प्रसार हेच जीवनध्येय

संपर्क : २४६ ए/ई, रत्नोदय सोसायटी, नागाळा पार्क,
कोल्हापूर. ✆ : ०२३१-६५१०४४